# मित्र आणि मैत्रिणी

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )





लेखकः—स० हृदय ( महाड )



महाराष्ट्र ग्रंथ भांडार प्रकाशन, गिरगांव, मुंबई



# — वाचक मित्रांना —



मी ' मित्र आणि मैत्रिणी ' लिहितांना कादंबरीचे मानीव तंत्र थोडेफार सांभाळण्याचा यत्न केलाच आहे. तरी पण कांहीं अनवश्यक उल्लेख वा अकारण मजकूर टाळण्यासाठीं रुळलेल्या मार्गाचा त्याग करून, आपलें उद्देश्य इच्छित साधावें म्हणून कांहीं वेळ पाऊलवाटेनें गेलों आहे.

हृदयाला चटका लावणाऱ्या, मनांत खोल जाऊन रुतलेल्या नि स्वानुभवसिद्ध झालेल्या अशा आकर्षक घटना निर्धारानें इतरांना सांगितल्या [illegible] असा [illegible] लेखकाच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. अशा घटना किंवा प्रसंग आजूबाजूला प्रत्यहीं घडत असतांना या कादंबरीचा विषय मला पूर्ण जाणीवेनें निवडावा लागला. राजकारणाचा वास वा उल्लेख नसणारी वाङ्मय-निर्मिति व्हावी अशी परिस्थिति लेखकाला काचक जाचक ठरते यांत दुमत असण्याचें कारण नाहीं. अशा पेंच परिस्थितींत, महाराष्ट्रांतील कोणत्याहि उपशहरांत आढळणाऱ्या वातावरणाचें नि भिन्न भिन्न प्रवृत्तींच्या लोकांच्या प्रातिनिधिक जीवन-प्रवाहाचें दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केला तर तो खचित योग्य ठरेल. प्रचलित समाजपद्धतींत अनेक विचार आचारांचें निसर्ग सिद्ध विरोध निर्माण होतच असतात. त्यांतच कांहींशा निसर्ग विरुद्ध रूढाचारामुळें समाजांत अनेक वर्ग उत्पन्न झालेले आहेत, तरी सुद्धा प्रत्येक जीवाची जगण्या-साठीं धडपड चालूच असते. अशा खेचाखेचींत एकाद्या व्यक्तींतून विशिष्ट वर्गाच्या एकजुटीशीं झगडा निर्माण होतो. मग परस्परांवर अनेक हेतूचे आरोप अधिक्षेपित केले जातात...त्यांतून जी धूळ उडते, जीं ढोंगें बाहेर पडतात, जीं मानवी स्वभाव वैचित्र्यें दिसून येतात त्याचें कांहींसें दर्शन करून देण्याचा माझा हेतू आहे. नाहींतरी, प्रत्येकाचें जीवन म्हणजे अशा लहान-मोठ्या विरोधी लढ्यांची सांगडच नाहीं का ?

" मित्र आणि मैत्रिणी " मध्यें वर्णिलेली परिस्थिति वास्तविक आहे असें वाटण्याइतका भास निर्माण व्हावा म्हणून यत्न केला आहे. अर्थात् यांतील पात्रे, परिस्थिति आणि प्रसंग पूर्णपणें काल्पनिक आहेत, त्यांचा कोणत्याहि हयात वा मृत व्यक्तींशीं यत्किंचितही संबंध नाहीं. मी निवडलेल्या काल्पनिक व्यक्ति त्या त्या वर्गाचे प्रतिनिधि वाटावेत म्हणून वास्तविकाचा भास निर्माण करण्यासाठीं अवश्यक असा दंडक पाळायला हवाच म्हणून पाळला आहे नाहींतर मित्र आणि

मैत्रिणी ही अद्‌भूत व्यक्तींची, वा घटनांची सुरम्य अशी स्वप्न रंजनात्मक कादंबरी ठरली असती. पण तसा माझा हेतू नसल्यामुळें यांतील जीं मुख्य मुख्य व्यक्ति–दर्शनें दाखविलीं आहेत त्यांचे जीवन–विचार–आचार दुसऱ्या एकाद्या प्रसंगीं अगदीं तसेंच असूं शकतील असें मी तरीं मानीत नाहीं. एकाद्याचें स्वभाव–चित्र रंगवितांना कादंबरीच्या हेतूला पूरक वा उठावणी देणारा असा त्यांतील एकादा भागच निवडावा लागतो. नाहींतर कादंबरींत समाविष्ट केलेल्या सर्व पात्रांचे सर्व दृष्टीनें अचूक आणि यथातथ्य चित्रण करावयाचें म्हटल्यास, त्या कादंबरीचे आवर्त गणित व्हायचा संभव असतो. माणसांचा स्वभाव परस्पर विरोधी असतो. परिस्थिति, स्वार्थ, नि आपत्ति त्याला तशी बनविते याशिवाय त्याच्यातील या अंतर्भूत विरोधाचें स्पष्टीकरण करतां यायचें नाहीं. नि ललित वाङ्मय–कार तरी काय करतो ? त्या त्या व्यक्तींच्या जीवनांतील अनेकापैकीं एकेक दालनच खोलून दाखवितो. मात्र तें त्याने बरोबर केलें आहे कीं नाहीं याचा अखेरचा विचार वाचकांनींच करायचा असतो.

साहित्यिक आणि वृत्तपत्रकार यांच्याविषयीं सांप्रत महाराष्ट्रभर तो वाद चालू आहे त्या बाबत एवढेंच सांगायचंय् कीं साहित्यिकापेक्षां, वृत्तपत्रकारच लोकजागृति करून त्यांच्या राष्ट्रीय भावना जास्त सुकरतेनें संवर्धित करीत असतो. हेंच मला "मित्र आणि मैत्रिणी" च्या शेवटानें सूचित करायचें आहे !

या कादंबरीचें नामाभिधान मला महाराष्ट्र ग्रंथभांडारचे [illegible] शंकरराव कुळकर्णी यांनीं नव्यानें सुरू केलेल्या आपल्या [illegible] "विसावा" नांव ठेवतांना सुचलें आहे. तें सार्थ वाटलें म्हणून योजलें.

माझ्या अनुभवांत मोलाची भर घालणारे असे माझे अनेक मित्र–परिचित आहेत, त्या सर्वांचें मला यावेळीं स्मरण होणे अपरिहार्य आहे. अशा कितींची नांवें मी देऊं ?

त्या सर्वांनीं मला उत्साह दिला...कुठल्याहि परिस्थितींत न खचतां हंसत मुखानें जगण्याचा–झगडण्याचा, आदेश दिला...तो मला कितपत मानवला हें वाचकांनीं मित्र आणि मैत्रिणी वाचून ठरवणेंच योग्य !

महाड–चैत्र शु ॥ १ संवत २०००

सर्वांचा नम्र
**स. हृदय**

# १

तो चैत्राचा महिना होतासा वाटतं. उष्मा प्रखर होऊं लागला होता. सायंकाळच्या थंड झुळकांना अवीट गोडी आली होती. ठायींठायी लोकांचे थवे बसलेले दिसत होते, तर तरुण-तरुणींच्या जोड्या हंसत खिदळत परस्परांच्या सहवासाच्या धुंदीमध्यें तरळत होत्या...कांहीं रिकामटेकडे उगाच इकडून तिकडे भटकत होते.

आंबेगांवच्या दक्षिण बाजूनें वळणावळणानें वहात जाणाऱ्या नंदा नदीच्या कांठच्या रस्त्यानें भय्यासाहेब नि आनंदराव सहल करीत गप्पा मारीत येत असतांना, त्यांना भेटलेल्या बऱ्याच गांवकऱ्यांचें लक्ष त्यांनीं वेधून घेतलें. प्रत्येकानें आपापल्या कल्पनेप्रमाणें त्या दोघांच्या भेटीचा अर्थ लावला.

कारण—उघड होते तें ! भय्यासाहेब हे आंबेगांवचे रेसिडेंट मॅजिस्ट्रेट होते नि आनंदराव गावांतील एक प्रतिष्ठित कॉंग्रेसवादी होते. दोन प्रवाहांचा संगम झालाच तर पाण्याची खोली वाढत नाहीं, नदीचे पात्र रुंदावते नि प्रवाहाला उथळपणा येतो. तसा कांहींसा प्रकार लोकांना दिसला नाहीं. म्हणून त्यांना आश्चर्य वाटणें सहाजिक होतें.

बहुतेकांनीं ' आनंदरावांना कांहीं तरीं लग्गा साधायचाय ' असें निश्चित ठरवून टाकलें. पण खरें कारण कांहींसे निराळे होतें.

भय्यासाहेबांनीं कॉलेज सोडल्यानंतरच्या काळांत कांहीं ललितलेखन केलें होतें. पण नोकरीच्या जंजाळांत सांपडल्यापासून त्यांच्याकडून भरीव असें वाङ्मय निर्माण झालें नाहीं. तरीं सुद्धां मिळेल तें मराठी नियतकालिक ते वाचीत; आंबेगांवला तें बदलून यायच्यापूर्वीच आनंदरावांच्या दोन कादंबऱ्या आणि बहुमोल टीकालेख अवलोकिले होते. अर्थात्, येतांच त्यांनीं आनंदरावांशीं परिचय करून घेतला त्यांत नवल असें कांहीं नव्हतें. खरं म्हटलं तर आनंदरावांविषयीं त्यांच्या मनांत असलाच तर सद्भाव होता. कांहींसा आदर वाटत होता त्यांना.

" तुमच्याजवळून खूप शिकून घ्यायचंय आनंदराव मला. मी एक कादंबरी लिहिलीय—पहाल कां ? " भय्यासाहेबांनीं आनंदरावांना विचारल्या-नंतर त्यांनीं अर्थातच कबूल केलें. पण त्या गोष्टीला तीन चार महिने उलटून जाऊनही भय्यासाहेबांनीं ती अपुरी कादंबरी आनंदरावांना वाचण्यास दिली नाहीं ही गोष्ट निराळी ! नि आनंदरावांनीं त्याबद्दल फारशी उत्सुकता दाखविली पण नाहीं.

सरकारी हुद्देदार—तालुक्याचा शहेनशहा म्हणजे पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट ! त्यांच्या नजरेच्या टप्प्यांत येण्यासाठीं अनेकांची धांवपळ चाललेली असते. त्यामुळें भय्यासाहेबांशीं जमणाऱ्या त्यांच्या मैत्रीचा कोणी विपरीत अर्थ लावूं नये म्हणून आनंदराव आपल्या परीनें जपत होते. कोणत्या झाडाला कोणतें खत घालायचें याचा विचार बागवानानें न करून कसें चालेल ?

अर्थात् प्रत्यक्ष भय्यासाहेबांनीं बोलावल्यावांचून आनंदराव कधींच त्यांच्या घराची पायरी चढले नाहींत. भय्यासाहेबांच्या मैत्रीकडे ते कांहींशा उदासीनतेनें आणि कांहींशा कर्तव्य म्हणून वागायला हवें या दृष्टीनें बघत होतें. अद्याप त्यांत फारसा जिव्हाळा उत्पन्न झाला नव्हता...पण तो कधींच होणार नाहीं असें मात्र आनंदरावांना वाटलें नाहीं हे तितकेंच खरें होते. प्रत्येकाच्या ठिकाणीं मानवतेचें कांहींना कांहीं सद्‌गुण वसत असतात असें मानणाऱ्यापैकीं

ते होते, तसा त्यांचा अनुभव होता म्हणाना ! पाण्याचा स्पर्शही अंगाला न लागूं देणारें कमळाचें पान त्या पाण्याच्या पोषणावरच हिरवेगार राहतें याची त्यांना जाणीव होती.

नि त्या सहलीच्या वेळीं त्यांचा तोच वाद चालला होता. भय्यासाहेबांनीं अद्यापपर्यंत आपल्या समोरील साक्षीच्या पिंजऱ्यांत नानातऱ्हेचे गुन्हेगार उभे राहिलेले पाहिलें होते. त्यापैकीं कित्येकांना त्यांनीं जबर शिक्षा पण सुनावल्या होत्या. अर्थात् मानवतेच्या आंतरिक सद्गुणांची तरफदारी आनंदराव करीत होते तितकी ते करण्यास तयार होईनात.

**भय्यासाहेबः**—मानवता म्हणजे उच्च सुसंस्कृत मानव म्हणत असाल तर तुमची तारीफ मी एकवेळ कबूल करतों. पण यच्चावत् मानव एकाच पंक्तीला बसविण्यास आपण तर तयार नाहीं.

**आनंदरावः**—ही अप्पलपोटी कोंडी मी मानण्यास तयार नाहीं–माझा तर अनुभव निराळा आहे. आपल्याला संस्कार असावेत, आपण सद्गुणी मानले जावे असें वाटूनही मनुष्य त्याविरुद्ध वागतो याचा अर्थ, त्याला आपल्या वागण्याचा प्रतिक्रियात्मक फायदा त्वरीत मिळावा अशी तीव्र मनीषा उत्पन्न होत असते. त्यासाठीं तो उतावीळ होऊन वागत असतो.

**भय्यासाहेबः**—पण ती उतावीळ मानवी नाहीं कां ? नाहींतर त्याला ती कां वाटावी ?

**आनंदरावः**—तसेंच नाही केवळ !! आपल्या भोंवतीं आनंदांत वावरणाऱ्या सुदैवी मानवांशी तुलनात्मक विचार त्याच्या मनांत उत्पन्न होतो म्हणून....!

**भय्यासाहेबः**—त्यालाच मी मत्सर म्हणतों. मत्सरापोटीं किती गुन्हे होतात हे आपण प्रत्यही पाहतोंच कीं.

**आनंदरावः**—खरें ! पण तो मत्सर सर्वांना सारखाच सतावीत असतो असें मानण्याचें कारण नाहीं. अभ्यासानें, सत्संस्कारानें–प्रयत्नानें मनाला वळण

लावतां येतेंच कीं, नाहीं तर मानवाच्या आशामय जीवनोत्कर्षाचा अर्थ काय ?

**भय्यासाहेबः**—पण हे सत्संस्कार प्रत्येकाला शिकवायचे कुणी ?

**आनंदरावः**—हा मुद्दा नाहीं. सद्वृत्ति लोकांना आवडते. आपल्याला सर्वांनीं नांवजावें अशी मूळांतच मनुष्याला इच्छा असते. त्याच सद्भावनेनें तो वागूं इच्छितो...नि त्याची ती इच्छा पुरी व्हावी अशी त्याच्या आजूबाजूची परिस्थिती उत्पन्न व्हावी—तसें झालें म्हणजे हे प्रश्न उत्पन्न व्हावयाचे नाहींत.

**भय्यासाहेबः**—मला वाटतें तुम्हीं समाजवादी विचारसरणी प्रतिपादीत आहां.

असें बोलत असतांना भय्यासाहेबांना उपेक्षेच्या भावनेनें फुटून आलेलें आपलें हास्य दाबतां आलें नाहीं.

**आनंदरावः**—माझी कोणती विचारसरणी आहे हा गौण प्रश्न आहे भय्यासाहेब! मनुष्य कमींत कमी गुन्हेगार वृत्तीचा व्हावा म्हणून त्याच्या मनावर सद्विचारांचे पडसाद निनादित व्हावेत, असेंच मी मानीत नाहीं केवळ. त्याला आपल्या प्रयत्नांना भरपूर वाव मिळावा अशी परिस्थिती जगांत नांदावी असें मीं मानतों.

**भय्यासाहेबः**—ही मध्ययुगीन रामराज्याची तुमची कल्पना व्यर्थ आहे, फोल झाहे.

**आनंदरावः**—मला मुळींच तसें वाटत नाहीं....उलट जगांत तशी स्थिती अनुकूल नसली म्हणजे आपण सद्भावनेनें केलेल्या एकाद्या कृतीचा वा आचरणाचा अर्थ आपणांला कल्पना सुद्धां करवणार नाहीं अशा स्वरूपांत, जग आपल्या सोईला परवडेल अशा तऱ्हेनें लावीत राहातें, हें मात्र माझ्या मनांत येतें नि मी खिन्न होतों. त्या मागचें मानसशास्त्र जाणूनही मनावरचें औदासिन्य जात नाहीं.

**भय्यासाहेबः**—सोपें आहे उत्तर याचें ! माणसाचा स्वार्थ नि अस्मिता यामुळेंच मनुष्य आपापल्या परीनें विचार करतो आणि तो बहुधा स्वतःला अनुकूल धरूनच चालतो.

आतां मात्र भय्यासाहेब मुद्यावर येऊन बोलले.

**आनंदरावः**—मला नाहीं तसें वाटत. त्याच्या मुळाशीं किती तरी गंड वस्ती करून करून असतात—अनेकविध अशा अपुऱ्या मनीषा असूं शकतात—नि बरीचशी आर्थिक हलाखीही कारणीभूत असूं शकते.

भय्यासाहेबांना आनंदरावांचें हें अव्यवहारिक बोलणें पटलें नाहीं. त्यांचा हा गूढवाद होय असें भय्यासाहेब मानून चालूं लागले. आनंदरावही न बोलतां तसेंच आपल्या विचारांत चालत होते.

**भय्यासाहेबः**—युद्धाचें पारडें फिरून दोस्तांना अनुकूल होत चाललें आहे हें सुचिन्ह नाहीं !

हवापाण्याचा विषय काढून बोलण्यापेक्षां कांहींतरी बौद्धिक चर्चा करावी या जाणीवेनें भय्यासाहेबांनीं युद्धाचा विषय काढून दीर्घ शांततेचा भंग केला.

**आनंदरावः**—मला नाहीं तसें वाटत—

असें बोलत असतांना आनंदराव इतक्या विमनस्क स्थितींत होते कीं आपण काय बोलून गेलों याची त्यांना जाणीव असावी असें म्हणतां येण्यासारखें नव्हतें.

**भय्यासाहेबः**—पण रोजच्या बातम्या पाहिल्या म्हणजे उघड होतें सारें.

**आनंदरावः**—या महायुद्धाकडे बघायची माझी दृष्टी बरीच निराळी आहे. त्यामुळें या तयार बातम्यांकडे मी लक्ष देत नाहीं. हिंदुस्थानला त्याचा काय फायदा होईल असा मी विचार करतों.

आतां मात्र आनंदरावांनीं भानावर येऊन उत्तर दिलें. त्यांचे हे कांहींसे उडवाउडवीचें उत्तर ऐकल्यानंतर युद्धासंबंधीं बोलणें परस्परांना सोईचें होणारें नव्हतें हें भय्यासाहेबांनीं हेरलें.

**भय्यासाहेबः**—गावांत यंदा वीज आल्यापासून गावाला शोभा आली आहे. नाहीं ?

भय्यासाहेब गावांत शिरतांना उद्गारले.

**आनंदरावः**—खरेंच आहे तें. विजेची आवश्यकता कबूल करूनही गावांत अगोदर पाणी यावयास हवें होतें. पण त्याच प्रश्नावर नगरपिते आपसांत मारामारी करीत बसले आहेत. जीवनाचा मुख्य प्रश्न डावलणें हाच त्यांच्या इभ्रतीचा प्रश्न होऊन राहिलाय. जनतेच्या हालाची जरासुद्धां कदर वाटत नाहीं त्या महापुरुषांना !!

**भय्यासाहेबः**—येईल. पाणी पण येईल गावांत लौकर.

अशा तऱ्हेचे त्यांचें बोलणें होत होत भय्यासाहेब आपल्या बंगल्या-पाशीं आले.

**भय्यासाहेबः**—येतां का वर–लेमन स्क्वॉश घेऊं आपण थोडें थोडें.

आनंदरावांनीं त्यांच्या आग्रहाला मान दिला. ते माडीवरच्या दिवाण-खान्यांत येऊन एका आरामखुर्चीवर बसले; नि समोरून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळुकीनें आनंदांत होऊन त्यांनीं आपली टोपी काढून आपल्या मांडीवर ठेवली त्याच क्षणीं शेजारच्या खोलींतून बाहेर पडणाऱ्या व्यक्तीनें बाहेर कोण आलें हें पहाण्यासाठीं दारावर झुलणाऱ्या पडद्याच्या आधारानें आनंदरावांकडे नजर टाकली.

त्यांनीं भय्यासाहेबांच्या त्या परिचित सौभाग्यवतींना, किंचित् हास्यवदन करून नमस्कार केला.

त्यांचा तो नमस्कार सुशिलाबाईंनीं स्वीकारला नाहीं नि जणूं काय कोणी परका इसम आपल्याला उगाच नमस्कार करून जादा शिष्टपणा मिरवीत आहे अशी भावना त्यांच्या त्या तरल चेहऱ्यावर त्यांना उमटलेली दिसली.

आनंदरावांना वाईट वाटलें...आपण कांहीं चूक तर केली नाहींना अशी उगाच रुखरुख त्यांना लागून राहिली.

वाऱ्याबरोबर सुगंध नेहमींच तरळत नसतो, कधीं कधीं डोळ्यांना चुरचुरणारी धूळही उडत असते हें त्यांच्या भावप्रवण मनाला पटायलाच हवें होतें कां ?

# २

आनंदरावांचें राहतें घर जुन्या पद्धतीचें पण चांगलें ऐसपैस होतें. माडीवर त्यांनीं बरींचशी दुरुस्ती करून आपल्या लेखनावाचनाला सोईचें असे बरेचसे फरक करून त्यांनीं सुखसोई निर्माण केल्या होत्या. पश्चिमेकडची भिंत पाडून चांगला भरघोस वारा यावा म्हणून त्यांनीं एक भली मोठी खिडकी तेथें बसविली होती. आणि त्या खिडकीसमोर आपली आरामखुर्ची पसरून आनंदराव कसलेंसे पुस्तक वांचण्यांत रंगून गेले होते.

घरांत आशेकडे कोणीतरी आलें असावें--नि चहासाठीं स्टोव्ह पेटविला असावा हें त्यांनीं नेहमींच्या आवाजावरून हेरलें होतें. पण वाचनाचा विषय तितकाच आवडता असल्यामुळें त्यांनीं आपल्या पत्नीच्या खालील हालचालीं-कडे दुर्लक्ष करून आपलें मन वाचनांत गुंतविलें.

**आशाः**—यायचं का खालीं ?

त्यांच्या पत्नीनें माडीवर येऊन दारांतूनच त्यांना विचारलें.

**आनंदरावः**—कां ? वर आणीनास चहा !

**आशाः**—खालींच चला सुशिलाबाईनीं बोलावलें आहे. चला ना !

केव्हांच्या आल्यात त्या ! !

आनंदराव निमूट बसलेले बघून आशेनें त्यांना आग्रह केला.

**आनंदरावः**--त्यांनीं बोलावले आहे ? नि मला ?

**आशाः**—होना ! दोनदां विचारले आनंदराव कुठाहेत म्हणून.

ते उठले. किंचित् विस्मयानें ते खालीं जाण्यास निघाले. आशा अगोदर निघून गेली होती.

ते माजघरांत त्यांच्यासाठीं मांडलेल्या पाटावर जाऊन बसतात तोंच सुभाताई पण आलेल्या त्यांना दिसल्या.

**आनंदरावः**—तुम्हीं केव्हां आलां. ताई ?

**सुभाताईः**—आतांच आलेय मी–नि मागच्या दाराने ! अजून टेंकले सुद्धां नाहीं मी...पण आनंदराव प्रथमच मी तुम्हांला बजावून ठेवतें...आतां तुम्हांला नाहीं मिळणार चहा...तुमच्यासाठीं टाकील आशा मागाहून...मी परभारेच कामाहून इकडे आलें. तुम्हा सर्वांच्या अगोदर पाहिजे चहा मला. वेग !

**आनंदरावः**—त्यासाठींच मागल्या दारानें आलां कीं काय ?

**सुभाताईः**—भ्यायला कीं काय तुम्हीं ? अय्या !

खट्याळ सुभद्राबाई खदखदून हंसल्या.

**आनंदरावः**—छे छे ! भ्यायचें कारण ?

**सुभाताईः**—अहो, अब्रू–मोठेपणा, नांवलौकिक नि हज्जार भानगडी आहेत कीं जपून ठेवण्यासारख्या तुम्हां पुरुषांना ! सूऽऽ

**आशाः**—दमलांत तर बसा कीं...कीं तेंही सांगायला हवंय ताई ?

**सुभाताईः**—छे. छे. कमाल झाली लोकांची ! या गांवच्या पुरुषांना दुसरीं कामेंच नाहींत वाटते ? दर आठवड्याला नाहीं म्हटले तरी आठ दहा बायकांचीं बाळंतपणें "अटेंन्ड" करावी लागतात. असा जीव मेटाकुटीस येतो कीं...जावं नि द्यावा जीव नंदा नदीत ! बघतां काय ?

**सुशिलाः**—सोडून द्या तीं नोकरी.

**आनंदरावः**—तुम्हांला नव्हते दुसरें काम म्हणून तुम्हीं नर्स झालां. ठेवा आतां आपल्या कमनशिबाला नावें !

**सुभाताई**:—पोट आहे ना मला ? कुठें तरी भरायला हवें. म्हणून आलें तुमच्या गांवाला...तुमच्या नगर पालिकेच्या सूतिकागृहांत नर्स म्हणून... पण गांव तरी काय—मेलें नंबर एकचें आहे. नमुना शोधून मिळायचें नाहीं बाई !!

**सुशिला**:—पण ताई ! इतरांचे राहूं द्या....आशा तुम्हांला कधी त्रास द्यायची नाहीं याची खात्री बाळगा !

**आशा**:—कांहो ? मी काय घोडं मारलंय तुमचं ?

आशा हंसली—तिनें आनंदरावाकडे साभिप्राय दृष्टिक्षेप केला.

**आनंदराव**:—कां ग ?

**सुभाताई**:—त्यांनीं केलाय गुरु...तूं पण बघ बाई एकादा, भारीच फिकट दिसतेस तूं अलीकडे नाहीं तरी ! नाहींना कांहीं ?

**आशा**:—वात्रट आहां ताई तुम्ही.

**सुभाताई**:—कुणाला इतका वेळ आहे वात्रटपण करायला ? कामापायीं मेटाकुटीस आलाय जीव माझा.

**सुशिला**:—ताई–तुमच्या वयाला शोभत नाहीं म्हटलें हें.

**सुभा**:—बरं हो आजीबाई ! तुम्ही तरुण माणसें. कधीं तरी खरं बोलाल तर रामशिवा गोविंदा. मनांत उसळी मारून येते तरी तें बोलायचं नाहीं, उलट ते सारें दाबून ठेऊन तोलून मापून बोलायचं म्हणून बोलता... मला राग येतो असल्या भलत्या ढोंगबाजीचा—काय तरी मेलं !

सुभाताई कांहींशा हिरीरीनें बोलत होत्या...त्यामुळें त्यांच्या त्या उद्गारांमागें विशेष कांहीं तरी घटना घडली असावी असें आनंदरावांनीं हेरले...त्या सरळपणें कधीं एकदां बोलायच्या नाहींत हें त्यांना ठाऊक होतें. म्हणून त्यांना बोलत ठेऊन त्यांच्या मनांतील गुपित बाहेर फुटतंय केव्हां याची वाट पहात बसले ते !

**आशा**:—पण ताई. मी आपला जीव तोडून हज्जार वेळां सांगितलंय तुम्हांला. पण खरं तें मानायची तुमची तयारी नाहीं त्याला काय करणार मेलें माणूस ?

**सुभाताई:**—बाई–बाई ! कुणाला वाटेल कीं खरंच सारें ! दे पाहूं माडीवरच्या कपाटाची किल्ली...पुराव्यानिशीं पकडतें तुला मी...

**आशा:**—हं या घ्या किल्ल्या नि शोधा माडीचे कानेकोपरे.

आशेनें खरोखरच आपल्या जवळच्या किल्ल्याचा जुडगा सुभाताईच्या अंगावर फेंकला...हा तिचा सात्विक संताप पाहून–निची सुभाताईना आव्हान देतांना झालेली हालचाल पाहून आनंदराव खूप झाले. आणि आपल्याच समाधानांत हंसले... तोंच आशेनें सर्वांपुढें चहाचें पेले आणून ठेवले.

**सुभाताई:**—पुरे की आनंदराव–हंसण्यावारी नेण्यासारखी ही गोष्ट नाहीं म्हटलं...बायकांच्या मनाचा विचार करा कीं थोडासा. लेखक आहां म्हणून सांगतें. तुमच्यापेक्षां भय्यासाहेब फार चांगले.

**आनंदराव:**—आशेचे आव्हान तर स्वीकारा अगोदर...काय शोधा-शोध करायची ती करा की मग वर जाऊन !

**सुभाताई:**—चांगले लबाड आहां तुम्ही दोघेंजणं ! तुमची तिशी उल-टून गेली तरी आम्हीं कांहींच तर्क न करतां तुम्हीं बोलतां त्यावर विश्वास ठेवायचा ? मूर्ख समजतां की काय आम्हांला ?

**आनंदराव:**—आशा, सांग–सांग की, सारें कांहीं खरें आहे म्हणून. आतां मात्र आनंदराव मनापासून हसले.

**आशा:**—कांहींच्या बाहींच कसं बोलवतें ?

**सुशिलाबाई:**—काय आहे हो ताई ? कसली भानगड आहे ही ?

**सुभाताई:**—भानगड ? नि ती आनंदराव करणार ? नांव या सोडून. भ्याड आहेत नुसते ! ! नि म्हणे पुरुष ! ! !

सुभाताई आतां मिष्कीलपणाच्या उर्मीनें हसल्या.

**आशा:**—ताई, तुम्हींच बोलतां म्हणून ऐकून घेतें म्हटलं मी !

**सुभाताई:**—ठावूक आहे.

**सुशिला:**—पण कशाविषयीं बोलतां आहां तुम्हीं ताई ?

**सुभाताईः**—तुमच्या वयाची ही आशा. सुशिलाबाई! नि तुम्हांला तीन मुलें होऊन संसार भरून गेलाय तुमचा ! ही सुधारकांची दुक्कल आहे. या आधुनिक जगांत जगायला—सुखानें जगायला बरं...!—जी पात्रता आणि मनाची तयारी लागते ती आपणांपाशीं आहे अशी घमेंड आहे यांना ! समजलं का आतां ?

**सुशिलाबाईः**—म्हणजे काय बाई ! मोघम का बोलतां ताई ?

**आशाः**—तुम्हीं काय विचारतां यांना. गप्प बसा हो ताई...

**सुभाताईः**—अजून यांच्या घरांत पाळणा कां हालत नाहीं याचें कारण विचारलें नाहींत कधीं तुम्हीं हिला ?

**आशाः**—कांहीं तरीच ताईचें आपलें !

**आनंदरावः**—पुरें कीं आतां ताई—! आशेला रडवणार वाटतें तुम्हीं ? बरं कां ताई ! आम्हीं आंबेगांवकरांचा तुम्हांला त्रास पडूं नये म्हणून...होय, खरंच ! खरंच ! !

आनंदरावांनीं तो विषय बदलण्यासाठीं म्हणून थोडासा गैरवाजवी विनोद केला...पण सुभाताईना त्याची दिक्कत नव्हती.

**आशाः**—ताईना होणाऱ्या त्रासाची कोण पर्वा करतंय. वेळ आलीच तर हक्कानें आणीन यांना घरीं.

**सुभाताईः**—आहे कां योग ?

**आशाः**—देवाच्या हातीं आहे सारं...वाटल्यास नवस करा.

**सुभाताईः**—मूल हवंय तुला. मी नवस करूं ? छान ! सुरेख. वाटल्यास तूंच या आनंदरावांपुढें नवस कर बापडा !

पुन्हा सुभाताईनें स्वैर बोलण्याचा फवारा सोडलाच. चहा संपून गेला तरी बराच वेळ त्या चतुष्टयाचे हसणें चालूंच होते.

इतक्यांत आनंदरावांच्या नोकरानें आलेलें टपाल त्यांच्या हातांत दिलें. तें त्यांनीं एकवेळ न्याहाळलें. बुकपोष्टें होतीं तीं त्यांनीं बाजूला ठेवलीं. बंदपत्रें

होतीं तीं फोडून आंतील मजकुरावर नजर टाकण्यास त्यांनीं सुरवात केली. थोडावेळ तेथें शांतता होती...नंतर...

त्या तिघीजणी आपापसांत कुजबुजू लागल्या. त्यांच्याकडे आनंदरावांचें लक्ष गेलें.

**आनंदराव**ः—खरेंच ! तुमचे वनितामंडळ काय म्हणतें सुशिलाताई ?

**सुशिलाबाई**ः—वा. छानच चाललंय ! आमच्या मंडळाच्या स्त्री सभासदांची संख्या पावणेदोनशेंवर गेलीय...मुलांचें आरोग्य कसें राखावें या संबंधीं परवांच डॉ. सिद्धपूर यांचे व्याख्यान झालं आमच्या मंडळापुढें !.

**सुभाताई**ः—नि सिद्धपूरांचे भाषण कोणालाही ऐकूं गेलं नाहीं.

एखादा पुराणिकासारखा हेल काढीत ताई बोलल्या.

**आनंदराव**ः—कांहो ?

**सुभाताई**ः—हें तुम्ही विचारावें आनंदराव ? अहो प्रत्येकीनें आपलीं दोन दोन तीन तीन चिल्लीपिल्लीं बरोबर आणलीं होतीं. त्यांच्या बाजारांत कसलं आलंय हो व्याख्यान ?

**आनंदराव**ः—नि म्हणूनच मी म्हणत असतो, माणसानें आधुनिक शास्त्रांचा उपयोग करून घेऊन आपलें जीवन सुसह्य–सुखी करावें.

**सुभाताई**ः—लोकं कुठें ऐकताहेत तुमचं ?

ताई आनंदरावांना चिडविण्यासाठीं हसली. पण त्यांनीं आपल्या समोरच्या एका पत्राकडे नजर लावली होती.

**सुशिलाबाई**ः—आतां आम्ही पुष्कळ काम वाढविणार आहो आमच्या मंडळाचे. गरीब मुलांना कपडे पुरविणे, गरजू बायकांना औषधें पुरविणे, त्यांच्या घरीं जाऊन आरोग्याची त्यांना माहिती देणें...

**आनंदराव**ः—वा–वा ! चांगल्या कल्पना आहेत या तुमच्या. आतां तुम्ही आंबेगावांत आहांत तोंवर सर्व कांहीं सुरळीत करून लोकांना तुमची आठवण राहील असें कांहीं तरी भरीव कार्य करून दाखवा तुम्ही–शक्यता आहे तुम्हाला म्हणून सांगतोय ! भय्यासाहेबांची हौस पुरी करा—

आनंदरावांनीं सुशिलाबाईना उत्तेजन दिलें. नि त्या उत्तेजनानें सुशिला-बाईची वृत्ति कांहींशीं उल्हासित झाली...त्यांना पुढें बोलल्याशिवाय राह-वलें नाहीं.

**सुशिलाः**—मंडळाच्या मदतीसाठीं आम्ही एक नाटक करणार आहों.

**आनंदरावः**—तरीच ! हं. आत्तां आठवलें. फिरायला गेलों असतांना परवां भय्यासाहेब भेटले. म्हणत होते कीं तुम्ही स्वतः त्या नाटकांत भूमिका करणार आहां ! खरें कां ?

**सुशिलाबाईः**—खरें वाटतें तुम्हाला ? मला खूप हौस आहे नाटकांत काम करण्याची......काय होईल हो मी केलें तर ?

**सुभाताईः**—वा. छान होईल कीं ! कुलिन स्त्रियांनीं नाटकांत कामें केलीं पाहिजेत असें माझें पण मत आहे.

पुन्हा ताईना राहवलें नाहीं. अगदीं नको होता तो त्यांनीं विनोद करून सुशिलाबाईचा उत्साहभंग केला हें त्याना आवडलें नाहीं. किंचित वेळ त्या थांबल्या.

**सुशिलाः**—आशेनें काम केलें नाटकांत तर...?

**आनंदरावः**—मी तिला आपण होऊन सांगणार होतों कीं—इच्छा असल्यास कर एकदां एकादी भूमिका...

**सुशिलाबाईः**—भाग्याची आहेस बाई आशा तूं !

सुशिलाबाईनी एक दीर्घश्वास सोडल्याचें सर्वांच्या लक्षांत आलें...त्या निमूट बसल्या...त्यांनीं आपल्या पुढची कपबशी उचलली नि ती मोरीवर नेऊन ठेवण्याचा चाळा त्यांना त्यांच्या नकळत केला.

**आनंदरावः**—पण भय्यासाहेब आपणहून माझ्याशीं बोलले, त्यावरून...

**सुशिलाबाई**—बोलायच्या नि वागायच्या गोष्टी निराळ्या असतात व तिकडच्या. तसेंच आहे ते...तुम्हाला नाहीं समजायचे ते...

सुशिलाबाई गप्प बसल्या...थोडावेळ तेथें शांतता होती—अशा या किंचितशा गंभीरवातावरणांतून बाहेर पडण्यासाठीं कोणत्या विषयावर बोलणें

काढायचे याचा प्रत्येकजण आपापल्या परीने विचार करीत होता...पठारावर खूप जोराचा वारा वहात असतो...पण त्यांत झाडींतील शीतलता नसते--

**आनंदरावः**--सुशिलाबाई ! परवां सायंकाळीं अशा कां माझ्याशीं वागलांत ? अगदी परिचय नसल्या प्रमाणें ?

आनंदराव सहज म्हणून बोलून गेले...

**सुशिलाबाईः**—तिकडे आवडत नाहीं परक्या माणसांशीं मी बोललेलें नव्हे त्यांच्याकडे पाहिलेले देखील—

**आनंदरावः**--अस्से ?

**सुशिलाबाईः**—मी त्यांची बायको आहे ना ?

**सुभाताईः**—नी भय्यासाहेब मात्र सैंपाकघरांत पाट मांडून आलेल्या बायकांशीं तासन् तास गप्पा छाटीत बसतात ते ?

तोंच आनंदरावांनीं एक गुलाबी रंगाचे बुकपोष्ट उघडले.

**सुभाताईः**—कां हो-! कुणाचं प्रेमपत्र आलंय वाटतं ?

बसल्या जागेवरून उठत सुभाताईने खंवचटपणा केलाच.

**आनंदरावः**—कुठाय आमचं भाग्य तसं ? हे आलंय तीं लग्नाची कुंकुम-पत्रिका. पहा...

असे म्हणतच आनंदरावांनीं ते पत्र सुभाताईकडे फेंकलें. त्यांनीं ते उचलले, आंतील मजकूर वाचला...नि त्या एकटयाच हंसल्या... हे बघून आशेने ती कुंकमपत्रिका घेऊन वाचली-आणि जरासे स्मित करीत तिने तीं सुशिलाबाईपाशीं परत दिली—त्या पत्रिकेवर वधूवरांचे फोटो छापून वर "कुर्यात सदा मंगलम्" असे लिहिले होते...खालीं हातांत हात घातला असल्याचा शेक हॅन्डचा एक ब्लाक मुद्रित केला होता...हे सर्व करूनही वराचा चेहरा खिन्न दिसत होता...लग्नपत्रिकेवर छापायचा फोटो तो तरी हंसतमुखाचा छापायला हवा याचे भान कुणालाही न राहावे याचे आशेला आश्चर्य वाटलें...

**सुभाताई:**—हा रडतोंड्या वर आहेना ? एकदां या मुलीशी त्याचे लग्न होऊं दे--म्हणजे बघा कशी अरेरावी गाजवील तो तिच्यावर...लग्न झाले कीं पुरुष चढतात घोड्यावर—

**आनंदराव:**—नि लग्नापूर्वी बायका पुरुषांना हरभऱ्याच्या झाडावर चढवतात--लग्न झालें की चांगला एकदम खालीं आदळतो पुरुष !

**सुभाताई:**—आहाहाहा...तोंड पहा आदळणाऱ्या पुरुषांची ! !

**आनंदराव:**—चिडला वाटतं ताई ! जाऊं द्या तें...अशा पत्रिका पाहिल्या की वाटतं आपलं लग्न उरकून घ्यावं.

आनंदराव केवळ गंमतीनें उद्गारले.

**सुभाताई:**—पण या आशाशिवाय दुसरी तरुणी असेल तरच तिच्याशीं तुम्हीं लग्नाला उभे राहणार.

**आनंदराव:**—कंटाळा आलाय हिचा. म्हणून तर दुसऱ्या लग्नाची कल्पना डोकावते माझ्या मनांत.

आशेकडे हांसत बघतांना आनंदराव उद्गारले.

**आशा:**—करा की दुसरी बायको. कारण तर छानपैकी आहे लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकायला.

**सुशिला:**—नि आम्हां बायकांना पण एखादें कारण नसेल असें वाटतं तुम्हांला आनंदराव ?

**सुभाताई:**—आपणां स्त्रियांना पुन्हां लग्न करण्याची संधी मिळालीच तर...तर बाई, सर्वजणी आपापल्या नवऱ्यालाच पुन्हां माळा घालतील—आम्हीं आर्यस्त्रिया आहोंत ना ?

**सुशिला:**—मुळींच नाहीं. आम्ही पण माणसंच आहोंत....आम्हांला पण कंटाळा येत नाहीं असें नाहीं.

**सुभाताई:**—मग—मग काय ? दुसराच नंवरा पसंत करणार तुम्हीं.

**सुशिला:**—तर काय ?

बोलण्याच्या हिरीरीनं सुशिलाबाई बोलून तर गेल्या पण त्यांचा त्या बोलण्यांतील जिव्हाळा...त्या मागची त्यांची पीडलेली मनस्थिती...मानसिक

यातना–जीवनाची कुचंबणा नि जीवित वैफल्याची जाणीव स्पष्टपणें उमटलेली दिसली आनंदरावांना...त्या त्यांच्या वाक्यानें स्तिमित झालेल्या आनंदरावांच्या उदार हृदयांत सुशिलाबाईविषयीं सहानुभूति–नव्हे दया उत्पन्न झाली. त्यांनीं त्यांच्याकडे एकच एक करुण दृष्टिक्षेप केला. शिखरावर उभें राहून खोल खोल दरींत डोकावण्यांत भयाण जिज्ञासा तृप्त होते खरी, पण त्यांत धोका असतो हें आनंदरावांना सांगायला पाहिजे होतें असें नाहीं...म्हणून ते निमूट बसून राहिले.

---

# ३

प्रत्येक सरकारी अंमलदाराचें कांहींना कांहीं विशिष्ट तंत्र ठरून गेलेलें असतें. ते ज्या नव्या नव्या गावांत बदलून जातात त्या गांवांतील सामान्य जनतेंत आपला आव राखून त्यांना सरमिसळ करतां येत नाहीं. आणि उघडपणें चारचौघांत बरोबरीच्या नात्यानें वागण्यासारखें त्यांनीं कांहीं करावें तर तें त्यांच्या हुद्याला कमीपणा आणणारें ठरण्याचा संभव असतो. आपल्या अधिकाराचा वोज सर्वांनीं तर राखला पाहिजे नि गांवकऱ्यांनीं आपल्याला भलें म्हटलें पाहिजे या परस्पर विरुद्ध वृत्तींतून जो मार्ग त्यांना चोखाळणें भाग पडतें तोच भय्यासाहेबांनीं अंगिकारला होता.

सौ. सुशिलाबाई मॅट्रीक होऊन कॉलेजमध्यें जाऊं लागल्या असतांना त्यांचे भय्यासाहेबांशीं लग्न जमलें आणि त्या त्यांच्या झाल्या. या आपल्या सुविद्य पत्नीकडून आंबेगांवांतील अविवाद्य अशीं सार्वजनिक कार्यें सुरू करून इतर सुविद्य लोकांना मार्गदर्शन करण्याचा त्यांनीं पायंडा पाडला. अर्थात् गावांत सूतिकागृह नव्हतें—आणि स्त्रियांची अशी संघटना तर नव्हतीच, होती तीं चार स्त्रिया देवळाच्या पायऱ्यांवरून जें कांहीं राजकारण–समाजकारण शिजवीत होत्या तेवढेंच—तेवढ्यानें कांहीं कोणाचें हित होणार नव्हतें हें सुशिलाबाईना पटलें नि त्यांनीं या दोन्हीं क्षेत्रांत आस्ते आस्ते पदार्पण

करण्यास सुरवात केली...आणि त्या कार्याचा त्यांनीं गेल्या एकाच वर्षांत बराचसा जम पण बसविला. यांत कोणाचेंहि दुमत होण्याचा मुतराम संभव नव्हता. आणि ही मुशिलाबाईनीं सुरू केलेली सार्वजनिक हिताची कामें चांगली नांवारूपाला येऊन त्यांना प्रगतिपथावरील वाळसेदार स्वरूप प्राप्त होईपर्यंत भय्यासाहेबांची बदली होण्याचा संभव नव्हता. स्वतः मुशिलाबाईनाहि असलीं कामें करणें म्हणजे केवळ उचापती करणें असें वाटत नव्हतें. तर खरोखरच आपण इतर स्त्रियांच्या उपयोगीं पडावें या सद्धेतूनें त्या आवडीनें तीं कामें करीत असत. त्यामुळें भय्यासाहेबांचा अंतस्थ हेतू अनायासानेंच साध्य होत असे नि त्यांना पाहिजे होती ती लोकप्रियता संपादन करण्यासारखी अनुकूलता सहजच प्राप्त होई. अर्थात भय्यासाहेबांची वाहवा ती मुशिलाबाईची ठरली जात होती. मुशिलाबाईच्या वाट्यांत भय्यासाहेबांचाहि वांटा पडला तर त्यांत नवल असें कांहींच नव्हतें.

नाहीं म्हटलें तरी इतकें शिक्षण पुण्यासारख्या शहरांत घेतल्याचा सुपरिणाम सुशिलाबाईच्या ठिकाणीं दिसून येत होता. त्यांचे हंसणें नि त्यामुळें त्यांच्या गालांवर पडणाऱ्या पसरट खळ्या पाहून कोणालाहि त्यांचें सौंदर्य आकर्षणीय वाटण्यासारखें होतें. त्या आंबेगांवाला बदलून आल्या त्यावेळीं त्यांच्या पाठीशीं तीन मुलांचे पाश होते तरी त्यांच्या खेळकर वृत्तींत—आणि मोकळेपणाच्या वागणुकीत फारसा फरक पडला नव्हता. त्या एखाद्या नवोढा तरुणीप्रमाणें नेहमीं उत्साही आणि प्रफुल्ल दिसत असत.

अशा मुशिलाबाई गांवांत आल्यानंतर लौकरच त्यांचा नि तेथील कांहीं शिक्षित स्त्रियांचा परिचय दृढ होण्यास वेळ लागण्याचें कारण नव्हतें. विशेषतः आनंदरावांची सुशिक्षित पत्नी आशा हिचा व त्यांचा मेळ पहिल्याच ओळखींत बसून गेला. आणि सूतिकागृहाच्या स्थापनेनंतर तेथें जी बाई नर्स म्हणून काम करूं लागली त्या सुभद्राताई नि सुशिलाबाई यांची पूर्वीची थोडी ओळख होती...त्यामुळें आशेशीं त्यांचा परिचय वाढला...तिच्या घरीं जातां येतां आनंदरावांशींहि त्यांचा परिचय झाला. त्या तिघांचें अगदीं मेतकूट जमत

असे नि गावांतील सर्व महिलांना हें माहीत पण होतें. सुशिलाबाईंना वनिता मंडळाच्या कार्यासाठीं लागणारी मदत आणि सहानुभूति तिच्या या दोघी मैत्रीणींकडून भरपूर मिळत असे. अर्थात मंडळाचें कोणतेंहि कार्य या तिघींच्या समितींत अगोदर घडून तयार होत असे हें उघड उघड गुपित होतें.

त्यांच्या वनिता मंडळाचा विस्तार कुंडींतील फोंफावणाऱ्या सदाफुलीप्रमाणें फुलत होता. गावांतील स्त्रियांचें आरोग्य सुधारण्यासाठीं त्यांच्यासाठीं व्यायामाची कांहीं तरी व्यवस्था करणें अपरिहार्य होतें; म्हणून त्या तिघींनीं भवति न भवती केली, नि सर्वानुमतें आंबेगांवच्या स्त्रियांत बॅडमिंटनच्या खेळाचा प्रसार करण्याचें मुक्रर आलें. तें गांव फारसें पुढारलेलें नव्हतें म्हणून स्त्रियांबाबत फारशी वाच्यता वा कुचेष्टा न होतां चार भिंतींच्या आंत त्यांना खेळतां येण्याजोगता तोच एक खेळ होता.

बॅडमिंटन कोर्टसाठीं सोईस्कर अशी जागा त्यांना प्रथम कुठेंहि मिळेना... तेव्हां भय्यासाहेबांनीं आपल्या बंगल्याच्या मागची उघडी जागा, साफसूफ करून घेऊन तिचें वनिता मंडळाच्या सभासदांसाठीं कोर्ट बनविण्यांत आलें.

सुभानाईंना कोर्टवर जाण्यास फारसा वेळ मिळत नसे. आशा मात्र मधून मधून तो खेळ खेळण्यास जात असे. सुशिलाबाईंच्या अत्याग्रहामुळें गावांतील-प्रौढ किंवा तरुणी आल्या नाहींतच-पण कांहीं मुली मात्र सायंकाळच्या वेळीं त्या कोर्टवर खेळण्यासाठीं एकत्र जमूं लागल्या होत्या. एवढी सुरवात सुशिलाबाईंना, गावांतील इतर स्त्रिया हळू हळूं खेळण्यास येण्याचा हिय्या करतील अशी उमेद बाळगण्यास भरपूर पुरेशी होती.

आशा कधीकाळीं कोर्टवर खेळण्यास गेली नि जर तेथें भय्यासाहेबांशीं तिची गांठ पडली तर ती त्यांना त्यांच्या प्रकृतिसंबंधीं विचारून त्यांच्याशीं चार शब्द बोलण्यास धजावली होती. नि भय्यासाहेबसुद्धां तिच्याशी मोकळे-पणानें बोलत. त्याच प्रमाणांत खेळण्यासाठीं तेथें येणाऱ्या इतर मुलींशींहि त्यांचें बोलणें-अर्थात परिचय वाढूं लागला होता. नि कधीं कधीं त्यांच्याशीं बोलण्यांत वेळ गेला म्हणजे भय्यासाहेबांचें सायंकाळचें फिरणें चुकत असे. नि तें साहजिकच होतें.

दसऱ्याचा शुभ दिवस होता तो! वनिता मंडळाची जणूं काय वार्षिक सभाच भय्यासाहेबांच्या माडीवर भरली होती.

तेथें स्त्रियांच्या सभेंत त्यांच्या लहानग्या मुलांच्या कलकलाटाच्या सांथीवर जे जे विषय निघणें साहजिक होते ते निघाले आणि त्यांतच कोणीतरी एकीनें वनिता मंडळाच्या-वतीनें " नव्या जुन्या " ही नाटिका बसवून तिचे होणारे उत्पन्न आंबेगांवच्या सूतिकागृहाच्या इमारत फंडासाठीं धर्मार्थ द्यावें अशी सूचना आणतांच त्या सर्वांनीं तिला पाठिंबा दिला...नि त्यांच्या त्या बेताला भय्यासाहेबांनीं त्यांच्या कानांवर ही गोष्ट पडतांच पूर्ण सहानुभूतिपूर्वक वृत्तीनें उचलून धरलें. इतकेंच नाहीं तर त्यांनीं ती नाटिका ' बसवून ' देण्याचेंहि अभिवचन देऊन टाकलें.

दर शनिवार-रविवारीं नाटिकेच्या तालिमीसाठीं त्यांत कामें करणाऱ्या तरुणी भय्यासाहेबांकडे जमूं लागल्या...यथावकाश त्यांनीं ते नाटक ठीक बसवून रंगभूमीवर आणलेंहि. अर्थात् सुशिलाबाईंना, त्यांत कामें करणाऱ्या स्त्रियांना दररोज चहा वगैरे पुरविण्याशिवाय इतर कसलेंहि काम देण्यांत आलें नव्हतें. आशेनें आपली भूमिका चांगलीच वठवली होती. विशेषतः यमू काशीकर नांवाच्या तरुणीनें केलेली भूमिका लोकांच्या नजरेंत भरण्यासारखी वठली. आंबेगांवच्या लोकांना स्त्रियांचा हा उपक्रम त्यांच्या खिशाला चाट लागल्यामुळें जरी महाग पडला होता तरी त्यांना तो आवडला यांत शंका नव्हती नि नाटिकेच्या शेवटीं असेंच दुसरें एक नाटक स्त्रियांकडून रंगभूमीवर लौकरच आणलें जाणार आहे, त्यावेळीं गावकऱ्यांनीं असाच उदार आश्रय देऊन सूतिकागृहासारख्या लोकोपयोगी संस्थेला उदार आश्रय द्यावा अशी विनंति करण्यांत आली होती...त्यावेळीं प्रेक्षकांनीं टाळ्यांचा प्रचंड गडगडाट करून आपली संमति व्यक्त केली.

जवळ जवळ एक आठवडा झाला तरी सुशिलाबाई तिच्याकडे आल्या नव्हत्या म्हणून स्वतः आशा त्यांना भेटण्यास गेली होती. त्यावेळीं तिला कळलें कीं सुशिलाबाईंचा थोरला मुलगा सुरेश सबंध आठवडाभर तापानें आजारी

होता. अर्थात आशा तेथें बराच वेळ गप्पा मारीत बसली होती...सुरेशला गेल्या रात्रीपासून उतार पडला होता.

**आशाः**—पण ताईना कळूनहि त्या कशा आल्या नाहींत माझ्याकडे मला कळवायला ? मला कळतें तर मी नसतें का आलें तुमच्या मदतीला मधून मधून...

**सुशिलाबाईः**—तुला ठाऊक नाहीं ? ताई तेव्हांपासून पुण्याला गेल्या आहेत.

**आशाः**—कां–मधेंच कां अशा एकदम गेल्या ?

**सुशिलाबाईः**—त्यांची का कुणाला दाद लागायचीय ? नि कळतंय कीं त्यांनीं आणखी रजा वाढवावी म्हणून अर्ज केलाय.

**आशाः**—एवढं काय अडलंय त्यांचें पुण्यास–बाई ?

आशा वरील वाक्य पुरें करीत आहे तोंच समोरच्या जिन्यानें भय्यासाहेब माडीवरील दिवाणखान्यांत गेल्याचें सुशिलाबाईनीं पाहिलें.

**सुशिलाः**—तिकडचं येणं झालं ऑफिसमधून...तरी मी वेडीनं त्यांच्या फराळाची कांहींच व्यवस्था केली नाहीं अजून !

सुशिलाबाई कांहींशा भीतीनें नि लगबगीनें उठल्या आणि स्वयंपाकघराकडे वळल्या.

**आशाः**—करूं कां मी मदत कांहीं ?

**सुशिलाः**—आंत जा नि स्टोव्ह तेव्हढा पेटव. मी हीं आलेंच !

आशा स्वयंपाक घरांत गेली. भय्यासाहेब सुरेशच्या खोलींत आले... त्यांनीं आपल्या चिरंजीवाकडे नजर टाकून नुसत्या नजरेनेंच त्याचा समाचार घेतला नि सुशिलाबाई गेल्या त्या बाजूस ते निघून गेले.

आशा स्टोव्हचे पंप मारून तो प्रज्वलित करीत आहे तोंच सुशिलाबाई तेथें आल्या. त्यांनीं चहाचें आधण ठेवलें, कांहीं बशा ट्रेवर मांडल्या आणि फळीवरून बरण्यांतून खाद्यपदार्थ काढून त्या त्यांतून भरूं लागल्या. तोंच भय्यासाहेब जिन्यावरून स्वयंपाकघरांत येतांना त्या दोघींनीं पाहिलें.

**भय्यासाहेबः**—अरे वा! आशाताई आल्यान वाटतं? कांहो? बोलत नाहीं तुम्हीं? रागावलां वाटतं आमच्यावर? अं?

**आशाः**—रागावूं कशाला?

**भय्यासाहेबः**—त्या दिवशींचें तुमचें नाटकांतील काम आवडलें कां आनंदरावांना?...नि ते फिरकले नाहींत इकडे कुठें तेव्हांपासून?

**आशाः**—त्यांना आवडलं कीं माझं काम.

**भय्यासाहेबः**—खूष आहेत ना ते?

**आशाः**—हो ना!!

**भय्यासाहेबः**—बसाना! अशा उभ्या कां? अहो–त्यांना पाट द्याना बसायला!!...हं असं...आपण इथंच घेऊं या चहा आज!

अर्थात् त्या सर्वांचा चहा तेथेंच होणार म्हणून आशा तेथें बसली... चहा पितांना पुन्हा बोलणें निघालें.

**भय्यासाहेबः**—वास्तविक पाहिलें तर, आनंदरावांनींच पुढाकार घेऊन नाटकाचें काम पुरें करायला हवें होतें. साहित्य हा त्यांचा प्रान्त आहे. नाणावलेले आहेत ते आज!!

**सुशिलाः**—पण त्यांनीं कां बोलावल्यावाचून यायचें?

**भय्या०ः**—कांहो पण, आशाताई! तुम्हीं नाहीं त्यांना सूचना केली? म्हणजे माझ्या मागचा नाटक दिग्दर्शनाचा व्याप वांचला असता...नि यापेक्षांहि तें चांगलें वठलें असतें...खरें पाहिलें तर ऑफिसच्या कामानें जीव अगदीं बेजार होऊन जातो माझा...पण यांची हौस आहेना? यांचे तें मंडळ आहे ना?

**सुशिलाः**—म्हणून मी जाऊं त्यांना विनंति करायला? इकडून त्यांना सांगायचं झालं असतें तर जमलें कां नसतें?

**भय्या०ः**—खरें! पण त्यांची भेट झाली नाहीं बरेच दिवसांत!

**सुशिलाः**—पण त्यांना बोलावून घेतल्याशिवाय कां ते इकडच्याकडे आपणहून खेटे घालीत बसतील उगीचच?

**भय्या०**:—आतां पुढचें नाटक सांगू त्यांनाच बसवायला हं ?

**आशा**:—त्यांत तरी सुशिलाबाई काम करणार आहेत ना भय्यासाहेब ?

**भय्या०**:—आपली हरकत नाहीं बुवा कुणाला...पण मला वाटतें मुलांच्या काळजीपुढें त्यांना तें जमायला हवें ना ?

तेवढ्यावरच पुढील नाटकासंबंधींचें बोलणें राहिलें होतें. नंतर इकडच्या तिकडच्या अनेक गप्पा निघाल्या...भय्यासाहेबांची नेहमीची फिरायला जायची वेळ टळून गेली होती. तोंच गावांतील चित्रपटगृहांत "ब्रह्मचारी" लागला असल्याची गोष्ट निघाली.

**आशा**:—येतां कां सुशिलाबाई आजच्या पहिल्या 'शो'ला ?

**सुशिला**:—नको बाई—! पाहीन पुढें मागें केव्हां तरी.

**आशा**:—पण आजचाच शेवटचा दिवस आहे म्हणे त्या चित्राचा इथं......

**भय्या०**:—पण तेंच चित्र पाहिलें पाहिजे असें तर नाहीना आशाताई ? भय्यासाहेब हंसले.

**आशा**:—तसं नाहीं ! आपण सर्वांनी मिळून तो एकदम पहावा असें मनांत आलें म्हणून सहजच विचारलें मी...मग ? जाऊं या कां आपण सर्व मिळून ?

**भय्या०**:—पण सुभाताई कुठं आहेत इथें ? त्यांना तर येऊं द्या. मग पाहूं कीं एखादा सिनेमा...त्यांत काय आहे मोठेंसें ?

पंधरावीस दिवस निघून गेले होते. सुभाताई आंबेगांवास आल्या होत्या. त्या दिवशीं "इंदिरा एम ए." हें चित्र सर्वांनीं मिळून पाह्यला जायचा बेत मुक्रर झाला होता...अगदीं नक्की झालें होतें..

चित्रपटगृहाचे आवारांत सुभाताई अगोदरच येऊन दाखल झाल्या होत्या. आशा-आनंदराव पण तेथें येऊन भय्यासाहेबांची वाट पहात रेंगाळत उभे होते...बोलपट सुरू व्हायची वेळ टळून गेली...तोंच एकटे भय्यासाहेब आपल्या पट्टेवाल्यासह तेथें हजर राहिले.

सुशिलाबाई आल्या नव्हता.

त्यांना कां ? असें विचारून तो क्षण—आनंदाची ती रात्र गंभीर विचार करण्यांत घालविण्यास कुणीच तयार झालें नाहीं...पण आनंदरावांनीं असें होईल असें हेरलें मात्र होतें खचित !

गुळवेल वाऱ्यावर कितीही डोलली तरी तिला फुलें कां यायचेंत्—अखेरीस तिचा औषधी म्हणूनच उपयोग...!

---

# ४

मे महिन्याचे अखेरचे दिवस सुटीचे होते म्हणून भय्यासाहेबांचा मुक्काम सध्यां पुण्यांत पडला होता. त्या दिवसांत आंबेगांवची उष्णता म्हणजे माणसाला शिजवून काढण्याइतकी तप्त आणि असह्य होत असते. शिवाय सुशिलाबाईंचे माहेर पण पुण्यास होतें. त्यामुळें त्यांना पुणेंच जास्त पसंत पडलें तर आश्चर्य असें कांहींच नव्हतें.

भय्यासाहेबांचा मूळ गांव कोठेंतरी सोलापूर जिल्ह्यांत होता. त्यांचे कॉलेज शिक्षण पुण्यासच झाल्यामुळें त्यांना तेथें कांही स्नेही लाभले होते. त्यांपैकीं बरेचसे स्नेही आपापल्या उद्योगानिमित्तानें पुण्यांतच राहिले होते. त्यांच्या सहवासानें त्यांच्या मित्रमंडळांत आणखी कांही नवीन मित्रांची भर पडली होती.

सुटी म्हणजे अत्यंत आनंदांत आणि कांहींशा बेछूट वागण्यानें संपविण्याचा कालखंड असतो. त्यामुळें भय्यासाहेबांचा रिकामा वेळ मौजा करण्यांत ब्रिज खेळण्यांत किंवा एकादवेळेस कोठेंतरी सुखसफरीला जाण्यांत निघून जाऊं लागला. इकडे मुलाबाळांच्या चिंतेतून आणि आल्या गेल्या ''तिकडच्या'' मित्रांच्या धबडग्यांतून उरलेला वेळ सुशिलाबाई आपल्या आईकडे जाऊन घालवीत असत. त्यांची खूप इच्छा होती की आशा आनंदरावांना पुण्यांत

आपल्याकडे बोलावून घ्यावें. भय्यासाहेबांच्या कानांवर घालून त्यांची परवानगी मिळविणें म्हणजे महाभयंकर काम होतें...जवळ जवळ अशक्यच होतें. पण एके दिवशी सुभाताई मात्र अचानकपणे त्यांच्याकडे येऊन थडकल्या; त्यावेळी सुशिलाबाई स्वैपाकांत गुंतल्या होत्या. दिवाणखान्यांत भय्यासाहेबांचा ब्रिजचा डाव अगदी रंगांत आला होता...नि आपल्या मित्रांसाठीं दुसऱ्यांदा मागविलेला स्वादिष्ट चहा संपवून मसाल्याच्या सुपारीची फकी मारून ते पुढची उतारी काय आहे हें पाहण्यांत दंग झाले होते. तरीसुद्धां त्यांनी सुभाताईकडे लक्ष देण्याइतकें अवधान राखलें.

**भय्यासा०:**—इकडे कुठें नाई तुम्ही? नि आंबेगावाहून केव्हां आलां पुण्यांत?

**सुभाताई:**—काल आलें सकाळीं १० वाजतां.

**भय्यासा०:**—कांहो? मध्येंचशा आलांत?

**सुभाताई:**—आलें सहजच!

**भय्या०:**—किती दिवस मुक्काम?

**सुभाताई:**—चार दिवसांची तर रजा काढलीय मी.

**भय्या०:**—काय म्हणतंय आंबेगांव?

**सुभाताई:**—तुम्ही नाहीं–सुशिलाबाई नाहींत–मग करून काय करणार बिचारें आंबेगांव? नांवाला म्हणून कसलीसुद्धां हालचाल नाहीं.

सुभाताईच्या बोलण्यांतील खोंच आणि मिष्किलपणा भय्यासाहेबांनीं हेरला.

**एक मित्र:**—बरेंच लोकप्रिय झालां आहां तुम्हां भय्यासाहेब तिकडे असं दिसतंय.

या त्यांच्या मित्राच्या उद्गारावर भय्यासाहेब खरोखरच खुबीच्या आवेगानें हंसले. सुभाताई आंत सुशिलाबाईंना भेटण्यासाठीं निघून गेल्या.

**दुसरा मित्र:**—बरीच धीट दिसतेय बाई बरं का भय्यासाहेब!

**भय्या०:**—नसायला काय झालें? त्यांचा जन्म पुण्यासच गेला. नवऱ्याच्या पश्चात् नर्सिंग शिकून बी. पी. एन. ए. झाल्या. स्त्रिया स्वावलंबी

झाल्या, म्हणजे त्यांना कुणाचीच पर्वा राहात नाहीं म्हणतात: असें झालंय खरं यांच्या बाबतींत.

**पहिला मित्रः**—पण यांना यरोड्याच्या तुरुंगाबाहेर उभ्या असलेल्या पाहिल्या मी काल. तिकडून मी आमच्या साहेबांना भेटून येऊन बसस्टँडवर वाट पहात उभा होतों तेथें मी—कुणी राजकैदी त्यांचा नातेवाईक आहे वाटतें ?

भय्यासाहेबांच्या चेहेऱ्यावर आश्चर्याचा भाव पाहताच त्या मित्राला ज्यास्त उत्साह वाटला म्हणून तो इतकें बोलला तरी...पण भय्यासाहेबांनीं मात्र त्याबाबत उत्सुकता व्यक्त करायला हवी होती ती न केल्यामुळें तो तेथेंच थबकला.

**दुसरा मित्रः**—राहूंद्याहो तो तुमचा राजकैदी ! खेळाकडे बघा जरा... हं भय्यासाहेब ! तुम्हीं क्लबची राणी उतरायची आहे की.

त्या मित्राचा ब्रिज पुन्हा रंगला...नव्हें रंगानें चढला देखील...तोंच भय्यासाहेबांना आंतून बोलावणें आलें.

**भय्यासाहेबः**—काय काम आहे ?

बसल्या जागेवरूनच दाराआड उभ्या असलेल्या आपल्या पत्नीस त्यांनीं विचारलें.

**सुशिलाबाईः**—ताईंना जेवायला ठेवून घ्यायचें का ?

**भय्यासाहेबः**—ठेवा की. त्यांत इतकें विचारण्यासारखें काय आहे ?

त्यांच्या या उत्तरानें आंतील व्यक्तीचें काम झालें.

अगदींच जेव्हां कंटाळा आला तेव्हां भय्यासाहेब उठून उभे राहिले. आणि आपले हात वर उंचावरून ते झाडून त्यांनीं एक मोठाला आळस दिला... त्यांची ती मंडळी उठली...आणि सायंकाळीं पुन्हा केव्हां यायचें हें निश्चित करून एकामागून एक असे ते सर्वजण निघून गेले...भय्यासाहेब घरांत वळले.

**सुभाताईः**—संपलें कां खेळणें ?

**भय्यासाहेबः**—कां ? या बोलल्या नाहीं तुमच्याशीं ताई ?

आपल्या पत्नीकडे बघत भय्यासाहेबांनीं विचारलें.

**सुभाताई:**—पण मला तुमच्याशीच बोलावेसें वाटत असलें तर ? सुभाताई हंसल्या.

**भय्यासाहेब:**—वा. वा ! आज आमचीशी गरज वाटली ?

**सुभाताई:**—म्हटलें–इथं पुण्यास कुठले आनंदराव भेटायला ?

भय्यासाहेबांच्या बोलण्यांतील अकारण मत्सर ओळखूनच ताईंनी खंवचटपणानें जाणूनबुजून उत्तर दिलें.

**सुभाताई**—कांहो. बोलत नाहीं ? आपल्या ओळखीच्या माणसाकडे येण्यांत चूक तर झाली नाहीं माझी ?...पण आनंदरावांनीं मला असे इतका वेळ ताटकळत ठेवलें नसतें कांहीं...

**भय्यासाहेब:**—काम काय तें बोलाल तर खरें ?

**सुभाताई:**—म्हटलें आपण आंबेगांवच्या सूतिकागृहाच्या बोर्डाचे अध्यक्ष आहांत...मला पगार वाढवाल तर पहा...हो–आपला माझा परिचय आहे त्याचा उपयोग मी न करून घेतला तर तो वेडपणा ठरेल–म्हणून म्हणतें.

सुभाताईंना आपले हंसें आवरतां आलें नाहीं—

**भय्यासाहेब:**—माझ्या एकट्याच्या हातांत काय आहे हो ?

भय्यासाहेबांना द्यायचें म्हणून कांहीं तरी उत्तर दिलें.

**सुशिलाबाई:**—वाढायचं का ?

**भय्यासाहेब:**—वाढा ना...जेवीत जेवीतच बोलू आपण—!

**सुभाताई:**—आपण येथें अनायासानें आलांच आहा...नि हा योग साधूनच मी रजा काढून आलें आहे...सदाशिव पेठेंत मुंजाबाच्या बोळाच्या तोंडावर माझें घर आहे. तें मी दाखवणार आहे आपणास ! माझा धाकटा दीर तें बळकावून बसलाय. त्या घरावर ताबा मिळवायचाय मला...

सुशिलाबाई पानें वाढीत होत्या. त्या दोघांचें बोलणें त्यांना ऐकावें लागतच होतें म्हणून ऐकत होत्या. त्यांत त्यांचं लक्ष असण्याचें काहींच कारण नव्हतें. जेवण चालू असतांनाच भय्यासाहेबांनी सुभाताईचें सारें म्हणणें ऐकून

घेतलें. कायद्याप्रमाणें त्यांच्या त्या घराचा अर्धा हिस्सा त्यांची कन्या शान्ता हिच्याकडे येत असून तिच्या नांवानें त्यांनीं आपल्या दिरावर दावा लावायला हवा असा आपला सल्ला भय्यासाहेबांनीं त्यांना दिला.

**सुभाताई—**पण त्यापूर्वी सामोपचारानें कांहीं मिटतें तर पहावें म्हणतें!

**भय्यासाहेबः—**तें कसे काय ?

**सुभाताईः—**खरं म्हणाल तर हेंच तें माझे आपल्याशीं जरूरीचें काम आहे. सवड असेल तर आपण माझ्या त्या दिराची भेट घेऊन, त्याच्यावर मी दावा लावला तर शेवटीं होणाऱ्या निकालाची त्याला आपल्या अधिकारवाणीनें जाणीव देण्यासाठीं त्याच्याशीं समजुतीनें बोलाल तर...मला वाटतें ठीक जमेल. तो तसा भित्रा नि कंजूष आहे.

**भय्यासाहेबः—**पण ताई ! त्याची माझी ओळख ना देख ! मी त्याला काय म्हणून भेटूं ?

**सुभाताईः—**माझ्यासाठीं !

**सुशिलाबाईः—**इकडचा नि ताईचा दाट परिचय आहे, नि आपला अधिकार त्या ओळखनात—त्यांनी इकडे यायचं नाही तर कोणाकडे जायचं !

**भय्यासाहेबः—**पण वकीलातर्फे होऊं द्या काय व्हायचें तें ताई !

**सुभाताईः—**पण वकील कोर्टात दाखल केलेला दावा चालवितील. तो दाखल व्हायच्यापूर्वीच आपल्या अशिलातर्फे तडजोडीची भाषा ते कशाला करतील...? त्यांत त्यांचा काय फायदा ?

**भय्या०ः—**माझी सिव्हिल लाईन नसली—तरी—तरी मी जरूर तो सल्ला देईन तुम्हांला ताई—त्याची खात्री असूं द्या...पण प्रत्यक्ष एकाद्याजवळ बोलणें करणें म्हणजे...

**सुभाताईः—**पण हें कांहीं आंबेगांव नाहीं—इथं आपण मॅजिस्ट्रेट म्हणून कोणाच्या लोकापवादाला भ्यायची जरूरी नाहीं.

**भय्यासाहेबः—**बरं—पाहीन जमलें तर.

भय्यासाहेबांचें हें उडवाउडवीचें उत्तर त्या दोघींनाहि रुचलें नाहीं. सुभाताई आतां जास्त भाषण करण्यांत फायदा नाहीं हें ओळखून निमूट

बसल्या. विजेच्या दिव्यांना कितीहि प्रखर प्रकाश असला तरी त्यांना ज्वाला नसते—नाहीं त्या ज्वालांनी शेगडीतील कोळसे पेटवण्याचा प्रयत्न केला तेंच आपलें चुकलें हे त्यांना कळून आलें...नको ते उगाच बोलून गेलो आपण असें त्यांच्या मनांत चमकून जातांच, आनंदरावांनी आपल्या या अपेक्षेला काय उत्तर दिलें असतें याची कल्पना करीत ताई बसून राहिल्या तोंच सुशिलाबाईचा चिडीस गेलेला आवाज त्यांच्या कानांत घुमला...

**सुशिलाबाईः**—पण मी म्हणते...त्या यमूसाठी हिंडण्याला जायला यायला सारें कांही जमते इकडे...नि...

**भय्यासाहेबः**—मी काय करावें, काय करतों यांत तुम्हांला पडायचें कारण नाहीं. तुम्हीं आपल्या पायरीनें वागत जा. तुमची अक्कल आपल्या तोंडाला पावडर फासण्याइतकी—फारतर एका झटक्यांत स्टोव्ह पेटविण्या-इतकी...हें विसरून वागत जाऊं नका !

भय्यासाहेब मनांतून खूप चिडून गेले होते. ते कांहींसें उसळूनच उत्तरले, आणि सुशिलाबाई कांहींशा भयभित वृत्तीनें त्यांच्याकडे बघूं लागल्या.

**सुभाताई**—हें काय हे ? रागवायला काय झालं ?

**भय्यासाहेब**—काय झालं ! यांना दोन दिल्या नाहींत तोवर यांचा चोंबडेपणा वाढतच चाललाय्—माणसानें—आपली पायरी सोडलेली मला नाही खपत हें यांना पटवून दिलें पाहिजे केव्हां तरी—

**सुशिलाबाई**—शोभेल—शोभेल ते इकडे बरं ! काय बाकी ठेवायची राहिली आहे ? एवढी तीन मुले झाली...तरी

**भय्यासाहेब**—एक शब्दहि पुढें ऐकायची इच्छा नाहीं माझी.

**सुशिलाबाईः**—घरांत बायकोला तरवारीच्या धारेवर धरायची- नि

यापुढें सुशिलाबाईच्या तोंडांतून शब्द बाहेर उमटेना. त्यांना रडेंच कोसळलें, त्या आंतील बाजूस जाऊं लागल्या...

**भय्यासाहेबः**—ताक वाढायचें राहिलें पानावर.

बिचाऱ्या सुशिलाबाई—! आपलें मन आवरून माघारी फिरल्या. मोरीवर जाऊन आपले नाक त्यांनी साफ करून डोळ्यांना पाणी लावलें.

आपले हात स्वच्छ करून त्यांनी तिकडच्या पानावर ताक वाढण्यास घेतलें. भय्यासाहेब त्या गोड गोड ताकाचे भुरके मारूं लागले होते. त्या त्यांच्या हातावर ताक ओतीतच होत्या.

सुभाताई त्या विचित्र पतिपत्नींकडे पहातच राहिल्या—त्यांचें डोकें अगदीं सुन्न झालें....

मागचा भात संपेपर्यंत अगदीं पूर्णपणें शांतता होती. कोणी कांहींच बोलूं शकत नव्हतें. भय्यासाहेबांनी एकामागून एक अशा तऱ्हेनें घेतलेल्या ताकभाताच्या नि आमटीच्या जोराच्या भुरक्यावरून ते मनांतून मनस्वी रागावले असावेत याची खात्री सुभाताईंना पटली. आंचवल्यानंतर टॉवेलला हात पुसीत पुसीत त्यांची नजर जिन्याजवळच्या कोपऱ्याकडे गेली. तेथील चौकटीवर नेहमी-प्रमाणें सुपारीचें भांडें असलेलें त्यांना दिसतांच ते तिकडे वळले व भांड्यांतील मसाल्याच्या सुपारीचे दोन चमचे त्यांनी आपल्या डाव्या हाताच्या तळहातावर घेतले.

**भय्यासाहेबः**—खरंच! विचारायचं राहिलं तुम्हांला ताई! काल येरांड्याला कुणाच्या भेटीला गेलां होतां?

**सुभाताईः**—विनायकराव जोग म्हणून माझे एक चांगले परिचित गृहस्थ आहेत तुरुंगांत. त्यांना भेटायचा दिवस होता कालचा—पण आपणाला कसें कळलें हें?

सुभाताईंना प्रथम भय्यासाहेबांच्या या प्रश्नानें आश्चर्यच वाटलें. त्यांना खरें उत्तर द्यावें की कांहीं तरी सबब सांगून वेळ मारून न्यावी याचा त्यांनीं एका क्षणांत विचार करून खरें तें सांगून टाकलें. आणि आपले परिचित एक कैदी आहेत—गुन्हेगार आहेत हें त्यांना कळतांच त्यांची प्रतिक्रिया त्यांच्या मनावर काय होते हें पाहण्यासाठीं त्यांनीं भय्यासाहेबांकडे आपली भेदक दृष्टि फेंकली...

**भय्यासाहेबः**—कसें कळलें? आमचे हेर असतात म्हटलं आजूबाजूला.

असें म्हणून आपल्याच नादांत भय्यासाहेबांना हसूं आलें. इतक्यांत पहिली सुपारी सरली म्हणून हातावर येईल तितकी भांड्यानें ओतून घेऊन तिचा

बोकणा मारून ते तेथून निघून गेले. सुभाताईंना वाटले होतें, कीं ते कांहीं चौकसपणा करतील म्हणून...पण नाहीं–निभावलें...त्यांना जरा हायसें वाटलें.

**सुशिलाबाई**:—बघितलंत ताई ! जणू कांहीं कांहींच झालं नाहीं असें दाखवून जायचं झालं...

त्यांना पुन्हा एकदां रडण्याचा आवेग आला...आला तो अगदीं जोराचा आला...ताई त्यांच्या पाठीवर हात फिरवूं लागल्या.

**सुभाताई**:—चूप बाई—! असं मनाला लावून घेऊन कसं चालेल बायकांचे ? चंदनाचें खोड झिजतें खरें...पण तें प्रत्येक वेळेला सुवास देतें... आलेल्या प्रत्येक प्रसंगानें स्त्रियांची सहनशक्ति वाढली नाहीं तर आपण मातृत्वाची थोरवी काय मिरवावी ? अँ ? चूप–चूप—!

सुभाताईच्या मातेच्या हस्तस्पर्शानें सुशिलाबाईंना बरें वाटलें. त्यांचा आवेग त्यांच्या आहारांत आला. त्यांनीं तो सांवरला. पुन्हा डोळ्यांना पाणी लावलें. आणि थंड पाण्याचा आपला हात त्यांनीं आपल्या विसकटलेल्या केसांवरून फिरविला. त्यांना हुशारी वाटली.

**सुभाताई**:—कशी ग अगदीं कुकुल्या मुलीसारखी हळवी तूं ? कसं समजत नाहीं तुला ? ज्ञान नि पुरुष म्हणजे दुधारी शस्त्रें—केव्हां ते जीविताला अपाय करतील याचा नेम नाहीं. म्हणून स्त्रियांनीं त्यांच्याशीं सांभाळूनच जपूनच—नि दुरूनच वागायला हवं—

ताई अशा तऱ्हेनें आपलें वाक्पांडित्य चालवीत होत्या नि तें सुशिलाबाई ऐकत होत्या. त्यांनीं सैंपाकघरांतील आंवराआंवर केली. जिकडची वस्तू तिकडे नीटनेटकेपणानें लावून ठेवली. वाहणाऱ्या पाण्यानें नदीकांठच्या मऊमऊ मातीची दरा धुपून जावी त्याप्रमाणें त्यांच्या चेहऱ्यावरचा रक्तिमा पार ओसंडून गेला होता. त्यांच्या नेहमींच्या प्रसन्नतेची शोभा निखळून गेली होती.

**सुभाताई**:—हें काय ? तुम्हांला जेवायचें नाहीं ?

**सुशिलाबाई**:—झालें हें इच्छाभोजन पुरे मला.

**सुभाताई**:—तुम्ही जेवा पाहूं अगोदर.

ताईनीं त्यांचें पाटपाणी मांडलें. त्यांनीं आवरून ठेवलेलें अन्न त्यांच्या ताटांत वाढलें...सुशिलाबाईनीं चार घास कसेबसे पोटांत लोटले. ताईना पण जरा बरें वाटलें.

सुशिलाबाईच्या हातावर सुपारी देत त्या हंसल्या.

**सुशिलाबाई:**—काय झालं हंसायला ?

**सुभाताई:**—खरं सांगा हं! तुम्हींच कां भय्यासाहेबांवर चिडून बोललांत एकदम ?

**सुशिलाबाई:**—किती दिवस मी माझें मन मारूं ताई ? मला हृदय आहे कीं नाहीं ? सारखे कढ येताहेत त्याला. तुम्हांला " म्हणे पाहीन जमलें तर " नि त्या यमूसाठीं पायपीट चाललीय सारखी ?

**सुभाताई:**—यमू–कोण यमू ? आंबेगांवची तर नाहीं ती यमू काशीकर ?

**सुशिलाबाई:**—होय, तीच ती महामाया बरं !

**सुभाताई:**—तरीच ! भय्यासाहेब मारे रंगांत येऊन तिच्या कामाची तारीफ करीत होते मागें मजजवळ–अस्सं ?

**सुशिलाबाई:**—करतील तर काय झालं ? इकडूनच सल्ला द्यायचं झालं होतं. म्हणे तिचें आपल्या नवऱ्याशीं पटत नाहीं. असें आपलें आयुष्य तिनें किती दिवस फुकट घालवायचें ? तिनें शिकूं कां नये ? नि म्हणून ही सारी खटपट चाललेय.

**सुभाताई:**—यमू झाली तयार शिकायला ?

**सुशिलाबाई:**—होना. म्हणून तर इकडचा जीव खालींवर होतोय तिला हिंगण्याला आणण्यासाठीं.

**सुभाताई:**—इथवर प्रकरण येऊन भिडलं तर ?

**सुशिलाबाई:**—समजलें ना आतां ? यमू आपल्या नवऱ्याला सोडून येणार आहे शिकायला पुण्यास...नि कां ? मला हें कळण्याची कांहीं अक्कल नाहीं. नि ती मी मिळविली पाहिजे असें मला मात्र वाटतां कामा नये. कारण नवऱ्याला सोडल्याशिवाय शिक्षण कसें तें मिळत नाहीं म्हणे !

सुशिलाबाई उपहासानें हांसल्या. नि सुभाताईनी गंभीर चेहऱ्याने एक दीर्घश्वास सोडला.

**सुशिलाबाई:**—दगड जेथे पडलेला असतो. तिथेंच शोभतो...तिथेंच त्याला किंमत असते, खरं ना ताई ?

सुभाताईनी कांहीं नाहीं त्या आपल्या विचारांत तेथें चारपांच येरझारा घातल्या. सुशिलाबाई 'बोलून तरी काय करणार' असा अखेरचा हताश वृत्तीचा विचार करून घर कामाला लागण्याचा विचार करीत होत्या

**सुरेश:**—आई—आई—मला हातावर दे ना कांहीं तरी.

त्यांचा पहिला मुलगा दुडदुड धांवत येऊन त्यांच्या समोर उभा राहिला.

**सुशिलाबाई:**—मग ये जा—जातोस की नाहीं ?

**सुरेश:**—मी नाहीं जा—मला आतां दे—देना ग आई—

**सुशिलाबाई:**—जा म्हणतें ना ! कारटं तरी कसलं वाहियात निपजलंय मेलं—ऐकायचं ठाऊक नाहीं जरा सुद्धां !

अखेरीस त्या उठल्या. तेथील खाऊचा डबा काढून त्यांनीं त्यांतील दोन श्रीखंडाच्या वड्या सुरेशच्या हातावर ठेवल्या. सुरेश नाचत नाचत तेथून निघून गेला.

**सुभाताई:**—काय गं ? असंच कां जन्मभर वागणार आहेस ?

**सुशिलाबाई:**—काय करूं तर ?

त्यांच्या उत्तरांतील कष्ट ताईनीं ओळखले-त्यांना सुशिलाबाईची दया आली. ताईचा जीव तुटला त्यांच्यासाठी. त्या जवळ आल्या-नि त्यांच्या खांद्यावर हात ठेवीत त्या बोलूं लागल्या.

**सुभाताई:**—बाई ग ! माणसाचं हृदय हें खेळणं आहे. नि मनुष्य हा खेळाडू आहे. म्हणूनच त्यानें आपल्या खेळण्याशीं लहान मुलें खेळतात तसलाच खेळ खेळला पाहिजे-अगदीं लुटुपुटीचा-अगदीं खोटाखोटा-जणूं काय जो खेळ खेळला जातो तो खरा नव्हेच ! किती दिवस अशी कुढत बसणार तूं ? अंतीं तूंच आपल्या मनस्वी दु:खाला कारणी होशील.. हिरव्या आंब्यानें पिकलें पाहिजे. आंतल्या आंत नासून कसे चालेल !

**सुशिलाबाई**—तुम्हाला नाहीं कळायचें माझें दुःख ताई !

**सुभाताई**ः—मोठींच शहाणाबाई लागून राहिलां आहां तें मला माहीत आहे. मोठ्या आल्यात मला सांगायला म्हणे दुःख !—चुलीत घाला त्याला—

**सुशिलाबाई**ः—बऱ्या सुटलांत एकदांच्या बाई तुम्ही...संसाराच्या या काचांतून.

**सुभाताई**ः—काच कसला आलाय—यांतच आनंदाचें मूळ आहे अशी माझी खात्री झालेय—तें फक्त आपण शोधून हुडकून काढलें म्हणजे मिळविलें सारें कांहीं !

**सुशिलाबाई**ः—तें काय तें शिकवण्यासाठीं एक शाळा काढा ताई तुम्हीं आंबेगावांत आमच्या वनिता मंडळातर्फे !

**सुभाताई**ः—वेडाबाई ! आहे कीं एक !

**सुशिलाबाई**ः—कुणाची ?

**सुभाताई**ः—आशेची—

**सुशिलाबाई**ः—मोठी आलीय आशा माहीत आहे मला...आनंदरावांचे श्रेय तिला कां देतां उगीचच.... ?

**सुभाताई**ः—मग काय तें मी घेऊं ?

आतां मात्र सुशिलाबाई अगदीं आनंदानें हलक्या—सुभाताईनीं पण जरासें स्मित केलं...

तोंच बाहेरच्या दिवाणखान्यांतून ब्रिजसाठीं खेळण्यास जमलेल्या "तिकडच्या" मित्रांच्या हास्याचा स्फोट त्या दोघांच्या कानावर पडला...

**सुशिलाबाई**ः—चहाची तयारी करायला हवी.

**सुभाताई**ः—करा तरी—मला पण घोटभर मिळेल.

---

# ५

शनिवारीं सायंकाळीं पांचच्या सुमारास आनंदरावांनीं भय्यासाहेबांना भेटून जावें असें एका पट्टेवाल्यातर्फे सकाळीं त्यांना कळविण्यांत आलें होतें. इतका तांतडीचा निरोप आला होता म्हणून आनंदराव नेमक्या वेळेला त्यांच्याकडे गेले. पाहतात तों भय्यासाहेब आपल्या तीन वकील मित्रांसह ब्रिज खेळत बसले होते. त्या तिघां वकीलांचा चहा संपला होता. ते सिग्रेट्स् पेटवून भपकारे सोडूं लागले होते. पण खुद्द भय्यासाहेब मात्र नेहमीप्रमाणें आपला चहा अगदीं ऐषारामानें चाखीत चाखीत पीत होते.

" या बसा. " भय्यासाहेबांनीं आनंदरावांना तेथें बसण्यास सुचविलें. ते बसले...पांच मिनिटें–दहा मिनिटें तशींच उलटून गेलीं–भय्यासाहेबांनीं संपलेला डाव पुन्हां खेळण्यास सुरवात केली. हें सर्व आनंदराव बघतच राहिले... ते तेथें भय्यासाहेबांसमोर बसून राहिले आहेत याची त्यांना दखलगिरी वाटत नसावी, अशी कोणालाहि शंका येणें सहाजिक होतें.

येथील अशा या वागणुकीमुळें आनंदारावांचें विचारचक्र चालूं लागलें... सध्याच्या धड ना इंग्रजी–धड ना पौर्वात्य अशा मिश्र संस्कृतीच्या आचारांमुळें आमच्या समाजांतील आदर सत्काराचे आणि दुसऱ्या माणसांना वागविण्याच्या प्रकाराचें सौहार्द पार लयाला गेलें आहे. परकीय पारतंत्र्यामुळें या गोष्टींचा

वाईटपणा कोणी दाखवूं लागल्यास खरें बोलणाराचेंच उलट हंसें होतें. शिवाय शिक्षणाची अवास्तव महति वाढविण्यांत आल्यामुळें गांवोगांव पदवीधरांचा असा एक विशिष्ट वर्ग बनून गेला असून त्या वर्गाला इतरेजनांना मर्यादेनें वागविण्याची फारशी कदर वाटेनाशी झाली आहे. या पांढरपेशा पदवीधरांना अहंगंड इतक्या बेमालूमपणें जडलेला असतो कीं त्या गंडाच्या आहारीं जाऊन आपण कांहीं गैर करीत आहों असें त्यांना वाटेनासें होतें. जगासाठीं आपण नसून आपणासाठींच जग आहे असें ते मानतात. जगांत वावरतांना आपल्या हातून चूक होणेंच शक्य नाहीं अशी त्यांची मनोमय खात्री होऊन गेलेली असते... अमेरिका-इंग्लंड-रशिया वगैरे पुढारलेल्या राष्ट्रांतील विद्वान कितीहि विद्याविभूषित असोत, त्यांच्या मागें पुढें सन्मानदर्शक अशा कितीहि पदव्या त्यांनीं मिळविलेल्या असोत, आपल्या नांवापुढें आपणहून त्या लावीत आपला आपणच दिखाम मिरवण्याचा शहाण्यांचा मुर्खपणा ते करीत सुटलेले नसतात. तसें करणें माणसाच्या सौजन्याचे द्योतक नसून अपरिपक्व बुद्धीचें प्रदर्शन होय असें सर्रास मानलें जातें. उलट पदव्यांची माळ गळ्यांत घालून मिरवणारांचे तेथें हंसे होतें—आमच्या समाजांत मात्र त्याच्या उलट प्रकार दिसून येतो हें आमच्या असंमजसपणाचें प्रासादचिन्ह आहे असें म्हणण्यापेक्षां देशाचें पारतंत्र्य, सुशिक्षित माणसालासुद्धां किती हीन मनोवृत्तीला पोचवितें—किती क्षुद्र विषय समाजाला जीवनाच्या महत्त्वाचें आधार वाटतात, जीविताची सर्वच मूल्यें उलटींपालटीं कशीं होऊन जातात याचा आमचा समाज म्हणजे उदाहरण आहे असें कोणालाहि वाटेल...आणि हें सर्व आपण जें करीत आहों—जसें वागत आहों हाच सभ्याचार होय असें त्यांना वाटतें. विशेषत: अशा अहंगंडवाल्यामध्यें सर्रासपणें डॉक्टर नि वकीलाचा भरणा असतो...त्यांच्या या दोन निरनिराळ्या धंद्यांवर इतर अज्ञ जनांचें जगणे अवलंबून असतें—समाजाच्या स्वास्थ्यासाठीं डॉक्टर लागतात. कायद्याचा अर्थ जाणणारे वकील लागतात—आणि त्याची प्रत्येक माणसाला हरहमेश गरज भासते. म्हणून जनता या वर्गांतील लोकांशीं वागतांना समजूतदारपणानें वागते. वकील डॉक्टरांच्या उद्दाम वर्तनाचा ती आपल्या सोईप्रमाणें अर्थ लावून घेऊन पड खाते...त्यांची

अरेरावी दिसली तरी कौतुकानें त्यांच्याकडे दुर्लक्ष करून आपलें काम भागवून करून घेते...व ज्यांच्याकडून आपलीं कामें करून घ्यायचीं असतात त्यांना विरोध दाखविणें सौजन्याचें नसतें हें जनता सूज्ञपणें जाणते... आणि याच जनतेच्या समंजस वागणुकीच्या जोरावर हे चढेल डॉक्टर्स—वकील वेड्यासारखे वागतात. अज्ञ जनतेच्या अशा दुर्बलतेचा आणि असहाय्यतेचा फायदा घेणें त्यांच्या पुरुषार्थाला—शिक्षणाला—माणुसकीला शोभा आणणारें नाहीं, हें त्यांना कळतच नाहीं. त्यांनीं दाखवावी ती बेपर्वाई आणि उपेक्षा जनता सहन करते म्हणून ती त्यांच्या कर्तृत्वाला उजाळा आणणारी नाहीं, उलट कमीपणा गौणत्व आणणारी आहे...पण दारू प्यायलेल्या माणसाला आपण शुद्धीवर असून जगानेंच नशा केली आहे असें वाटतें ! तद्वतच हे शिक्षणाच्या पाणपोईवर वाघिणीचें दूध प्यायलेलें डॉक्टर्स वकील आपण म्हणजे देवाचे अवतार आहोंत असें जगानें मानावें, लोकांनीं या मोठ्यांचे सेवक म्हणूनच वागावें अशा गुर्मीनें वागतात...आणि विशेष म्हणजे, दारुड्याचा अंमल उतरला म्हणजे त्याला आपण प्यायल्याबद्दल शरम वाटते. पण या विद्यामदप्यांना तेंहि वाटत नाहीं....उलट जगांत आपल्यापेक्षां बुद्धिवान, कर्तृत्वशाली माणसें असूं शकतच नाहीत असें मानणाऱ्या या वर्गाला जर एकादा तल्लख बुद्धीचा आणि कर्तबगार असा इतर मनुष्य दिसला तर...तो तसा नाहीं हे जगाला दाखविण्यासाठीं हा वर्ग एक होतो. आणि मिळेल त्या प्रसंगाचा उपयोग करून घेऊन त्या माणसाला खालीं ओढण्याचा बनाव घडवून आणतो. सबूरी, सौजन्य भावना, आणि समंजसपणा हे शब्द या वर्गाच्या कानावर गेले आहेतसे न वाटण्यासारखे ते इतरांशीं वागतात...याचें प्रत्यंतर आनंदरावांना वारंवार आलें होतें...आणि तें आजहि त्यांच्या वांट्याला यावें हेंहि कांहीं नवल नव्हतें—कारण आनंदराव कांहीं पदवीधर नव्हते. जेमतेम मॅट्रिक होऊन घरच्या घरीं राहून मिळेल तें ज्ञान संपादून आपला वाडलार्जित उद्योग सांभाळणारे एक क्षुद्र मानव—त्यांच्यापाशीं का बुद्धि आहे—संस्कार आहेत कीं मानवतेचे सद्‌गुण आहेत म्हणून आंबेगांवांतील या पदवीधर वर्गांतील महाजनांनीं त्यांना जरा म्हणून मानावें !

वकील डॉक्टरांशिवाय मान देण्यासारखी जगांत माणसेंच नाहींत असा या वर्गाचा दंडकच ठरला असला—आणि समजा तो महामूर्खपणाचा असला तरी त्याला आनंदराव काय करणार—आणि तो त्यांचा दृढ समज ते तरी कसा घालवूं शकणार ?

गंमत ही कीं त्या तिघां वकिलांना आनंदरावाकडे आपल्या डोळ्यांच्या बुबुळांची हालचाल करूनसुद्धां पाहण्याचें प्रयोजन वाटलें नाहीं—त्यांना न वाटो...पण प्रत्यक्ष भय्यासाहेबांनी त्यांना बोलावून घेऊन त्यांच्याशीं असे वर्तन करावें याविषयीं त्यांना नाहीं म्हटलें तरी वाईट वाटलेंच.

त्यांनीं तेथील जमीनीवर पडलेला इलस्ट्रेटेड वुईकलीचा अंक उचलला. त्यांत कांहीं वाचण्यासारखें नसतें हें त्यांना माहित होतें तरी त्यातील चित्रें पाहण्यास सुरवात केली...पंधरा मिनिटें गेली तो एवढा मोठा अंक, तो पण त्यांचा चाळून झाला...शेवटीं ते कंटाळले नि तेथून उठून जावें असें त्यांच्या मनांत आलें. पण त्यांनीं तो विचार आवरला.

**आनंदरावः**—किती वेळ लागेल साहेब ?

**भय्यासाहेबः**—बसा की...! कांहीं काम नाहीना घरीं ?

**आनंदरावः**—नाहीं...पण...पण तुमतें किती बसायचें येथें ?

**भय्यासाहेबः**—असं होय ? खरेंच ! तुम्हाला ब्रिज खेळता येतो की नाहीं ? तर मग आमचा खेळ पहात बसाना वाटल्यास—आत्तां संपवितों... पहाना ब्रिज खेळतांना कशी असाधारण बुद्धिमत्ता वापरावी लागते हें कळेल तुम्हाला...मी गेल्या खेपला पुण्यास शिकलो तेव्हांपासून ब्रिज हातांतून खालीं ठेवूंच नये असें वाटण्याइतका नाद लागलाय मला या खेळाचा—अहो—दुनियेंत इतका चांगला खेळ शोधून सांपडायचा नाहीं.

भय्यासाहेबांचें बोलणें संपविणें भागच पडलें.

**आनंदरावः**—कां बोलावलें होतें मला ?

**भय्यासाहेबः**—कांहीं विशेषसें नव्हतें काम ! सहज गप्पा मारायला बोलावलें होतें तुम्हाला...बरेंच दिवसांत फिरकलां नाहीं कुठें ?...याना, बसा, तुम्हाला शिकवितों मी ब्रिज—

**आनंदराव:**—मला पत्त्यांचा खेळ मुळींच आवडत नाहीं.

आनंदरावांनीं सहज म्हणून आपला पत्त्यांच्या खेळाला विरोध दाखवला. पण एकादा बाँवगोळा पडावा त्याप्रमाणें ते तिथे वकील चपापले—आणि प्रथमच आनंदराव हे किती अडाणी—हजारों वर्षें जगाच्या मागें आहेत अशा उपेक्षेच्या भावनेनें त्यांनीं आपली दृष्टि आनंदरावांवर रोखली...जणूं ते सर्व-जण न बोलतांच त्यांना म्हणत होते...

"माणूस आहेस कीं जनावर आहेस ?"

**भय्यासाहेब:**—नको तर नका शिकूं तुम्ही ब्रीज...पण तुम्हाला पत्त्यांच्या खेळाला अशीं एककल्लीपणानें नांव ठेवतां येणार नाहींत आनंदराव... बरं. तें जाऊं द्या...हल्लीं तुम्ही काय लिहीत आहां ?

**आनंदराव:**—विशेष असें नाहीं.

**भय्यासाहेब:**—आशाताई बऱ्या आहेत ना ?

**आनंदराव:**—बरी आहे ना...ठीक तर...मी जातों.

आनंदराव तेथील त्या मानभावी आणि पोकळ बोलण्याला कंटाळले—त्यांना वीट आला त्या मृतवत वातावरणाचा ! ते एकदम उठले. नि तेथून पळ काढण्यासाठीं त्यांनीं दरवाजा गांठला.

**भय्यासाहेब:**—उद्यां याना आनंदराव याच वेळेला...बसूं बोलत.

आनंदराव नुसते होकारून चालते झाले.

भय्यासाहेबांची ही उपेक्षेची वागणूक मानी आनंदरावांना अपमानास्पद वांटली...त्यांनीं भय्यासाहेबांशीं परिचय आपणहून वाढविला नव्हता. उलट भय्यासाहेबांनीं त्यांच्याशीं परिचय करून त्यांची मैत्री संपदण्याचा आव आणला होता...ते भय्यासाहेबांकडे जात असत ते, ते पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट होते म्हणून नव्हे—तर ते एक सद्गृहस्थ आहेत, त्यांच्याशीं त्या नात्यानें झाला तर आपला परिचय दृढ करावा अशी त्यांची इच्छा होती...आनंदराव मनानें आणि तत्वज्ञानानें राष्ट्रीय बाण्याचे होते त्यामुळें कोणत्याहि सरकारी अमंल-दाराला तो केवळ अंमलदार आहे या भ्याडपणाच्या भावनेनें केव्हांहि 'सलाम' ठोकण्यासाठीं आपले हात वर उचलले नाहीं...त्या अंमलदाराची

ओळख होऊन त्याच्या परिचयानंतर त्याच्या ठिकाणीं सभ्यपणाला शोभा देणारे गुण नि थोडीफार माणुसकी आहे असें त्यांना वाटलें तर मात्र ते आपला परिचित म्हणून त्याला सलाम करीत, त्याच भावनेनें भय्यासाहेबांच्या परिचयाकडे त्यांनीं पाहिलें होतें. पण त्यांनीं जें कधींच अपेक्षिलें नव्हतें—तें त्यांना आज अवलोकन करावें लागलें. इतर अंमलदारांना आपल्या भोवतीं हांजीखोर माणसांचें–स्तुतिपाठकांचें–वर्तुळ सदैव घोंघावत असावें, आपला मोठेपणा, ऐश्वर्य जगाला—अज्ञ जनतेला प्रतीत व्हावें असें वाटत असतें त्यासाठीं त्यांना तशी माणसेंहि हवीं तेवढीं मिळतात...तसें तर भय्यासाहेबांना वाटत नसावें ? आनंदरावांसारखा एक मनुष्य त्यांच्या शोभेचा प्राणी म्हणून त्यांच्या आजूबाजूला झुलूं शकतो असें लोकांना दिसलें तर आपली खानदानी उठून दिसेल, लौकिक वाढेल असें तर त्यांना वाटत नसावें ? असें आनंदरावांच्या मनांत येऊन गेलें ! !

त्यांतल्या त्यांत एक सूक्ष्म विचार आनंदरावांच्या भावप्रवण मनाला स्पर्श करून गेलाच ! असें वाटणें चूक असो वा बरोबर असो—पण भय्या-साहेबांनीं परस्परांचा परिचय—मैत्री ओळखून त्या वकीलांदेखत तरी आनंदरावांशी असें वागायला नको होतें. भय्यासाहेब स्वतः चहाचे घोंट घेत असतांना आनंदरावना नुसते 'चहा घेतां कां ?' असें विचारण्याचें सुद्धां सौजन्य त्यांनीं दाखविलें नाहीं ही गोष्ट आशेच्या मनाला विशेष लागली. अर्थातच अशा या माणसाशीं शक्य तर न बोललेलें बरें या भावनेनें ती सुशिलाबाईंना सुद्धां भेटायला गेली नाहीं.

कांहीं दिवसानंतर, वनितामंडळाच्या सभेच्या वेळीं त्या दोघींची भेट झाली. पण ती तेवढ्या पुरतीच ! त्यांना बोलण्यास संधि मिळाली नाहीं.

एके दिवशीं सायंकाळीं गावांतील "पाहणी" आटोपून सुभाताई आशेला भेटण्यास आली होती. बराच वेळ तें त्रिकूट गप्पा मारीत होतें.

दीडवर्षापूर्वीं सुभाताईच्या एकुलत्या एक शांतेचें लग्न झालें होतें. ती चांगल्या ठिकाणीं पडली होती,–तिचा पती तिच्यावर प्रेम करीत होता...ती चांगली सुखांत होती...तिचे पहिलेंच बाळंतपण होतें म्हणून सुभाताई मागें

पुण्यास गेल्या होत्या, नि म्हणूनच त्या तेथें बरेच दिवस राहिल्या. ही गोष्ट आशेला त्यांनीं लहरींत येऊन निवेदन केली. ताईना नातू झाला म्हणून तें जोडपें पेढे मागणार, पण त्यांत विशेषसें कांहीं नसल्यामुळें देणार नाहीं असें ठरवूनच त्यांनीं त्या घटनेची कोणालाहि दाद लागूं दिली नाहीं.

पण ताई शेवटीं अबलाच ठरल्या, त्यांच्या पोटांत तें कांहीं केल्या राहूं शकलें नाहीं.

**आशाः**—चला ! संपलें आतां ताईचें ! त्या म्हाताऱ्या झाल्या !

**सुभाताईः**—कां-कां मी म्हातारी असेन ?

**आशाः**—तुमचा नातू आतां तुम्हाला 'आजी' हांक मारील ना ?

**सुभाताईः**—आग जा ! मुलीचा मुलगा आहे म्हटलं-मुलाचा नाहीं.

**आशाः**—इतकी आसक्ति असणं वरं नाहीं ताई !

**सुभाताईः**—मला शिकवतेस तूं आशा...कालची पोर तूं...तें राहूं दे ! येतेस कां फिरायला ! सूतिकागृहापर्यंत पोंचीव मला...चलतेस ?

**आशाः**—चला-आम्हाला पण फिरायला जायचंच आहे.

**आनंदरावः**—पण मी वरोबर आलेला चालेल कां ?

**सुभाताईः**—तुम्हाला चालेल कीं नाहीं तें तुमचें तुम्ही बघून घ्या ! पण एक गोष्ट तुम्हाला मानावी लागेल...सूतिकागृहाच्या बाहेर रस्त्यावर उभे राहावें लागेल तुम्हाला...नि मी तुम्हाला चहा द्यायची नाहीं...आशा येईपर्यंत तुम्हाला बाहेरच उभें राहावें लागेल.

**आनंदरावः**—कबूल !

ते मनापासून हंसले.

तीं तिघेजणं मजेनें सहल करीत नदेच्या कांठाकांठानें चाललीं होती. पण फिरायला गेलेल्या कित्येक सभ्यगृहस्थांचे डोळे त्यांच्याकडे लागून राहिले होते. त्यावरून त्यांचें तें फिरणं उद्यां गांवभर होणार याची आनंदरावांना कल्पना आली. पण त्यांनीं फारसें लक्ष दिलें नाहीं त्या लोकांकडे !

**सुभाताईः**—आनंदराव ! तुम्हाला एक चटकदार गोष्ट सांगेन सांगेन म्हणून बरेच दिवस म्हणत होतें. मला तुमचें मत हवंय त्या गोष्टीवर. ती घडल्या-

पासून माझ्या मनाला चटका लागून राहिला आहे...मी मुंबईस असतांना डॉ. शिरोडे-करांच्या रुग्णालयांत नोकरीला होतें. मी गोरेगांवकरांच्या चाळींत राहात असतांना आमच्या शेजारीं विनायकराव जोग या गृहस्थांचें बिऱ्हाड होतें. विधुरावस्थेंमुळें त्यांनीं चंद्रा नांवाची आपली एक निराधार बहिण आपल्याकडे आणून सांभाळली होती. चंद्रामुळेंच माझा त्यांचा परिचय झाला. माझ्या शांतेला ते मधून मधून शिकवूं लागत. विनायकराव मालस मितभाषी होते. त्यांचे आयुष्य अशा शांततेनें चाललें असतांना एके दिवशीं एक घटना घडून आली. मी घरीं येतांच मला सर्व कळलें. आश्चर्याचा प्रचंड धक्का बसला मला...ते त्या दिवशीं हपीसांतून आले होते—तों कधीं नाहीं तो दारू पिऊन चंद्राचा नवरा तेथें आला; आणि चंद्राला ‘ चल ’ म्हणून ओढून नेऊं लागला.

**आशाः**—कुठें नेत होता तो चंद्राला ?

**सुभाताईः**—कुठं नेणार ? त्याला नव्हतं घर ना दार !

**आनंदरावः**—कां थांबलांत ताई ? पुढें काय झालं ?

**सुभाताईः**—आंत त्या तिघांचें भांडण झालें म्हणे. शेवटीं काय झाले कुणास कळे ! विनायकराव धावऱ्या धावऱ्या बाहेर आले. नि शेजारच्या एका मुलाला त्यांनीं डॉक्टरना बोलावून आणण्यास पिटाळलें...डॉक्टर आले... चंद्राचा नवरा मरण पावला होता. त्या प्रकरणांत शेवटीं विनायकरावांवर खटला चालून त्यांनीं आपल्या मेव्हण्याला जबर दुखापत केल्याचा आरोप त्यांच्यावर सिद्ध झाला. त्यांना पांच वर्षे सक्तमजुरी मिळाली.

**आनंदरावः**—यांत तुमच्या मनाला लागणारी घटना कोणती ?

**सुभाताईः**—मला मुळींच पटत नाहीं. विनायकरावांसारखे सज्जन त्या दारूड्याला असें मारतील म्हणून !

**आशाः**—हल्लीं ती चंद्रा कुठें आहे ?

**सुभाताईः**—दीडएक वर्षानंतर ती आपल्या धाकट्या भावाकडे मरण पावली म्हणे !

**आनंदरावः**—बरोबर दिसतंय ! चिडलेल्या चंद्रानें रागाच्या भरांत कशानें तरी आपल्या त्या आततायी नवऱ्याला एकादुसरा तडाखा दिला

नसेल असें नाहीं. तो भलत्याच ठिकाणीं नेमका लागला असल्यास तिचा नवरा मरणें अशक्य नाहीं.

**आशाः**—पण कांहीं झालें तरी चंद्रा आपल्या नवऱ्यावर कशी काठी टाकील ?

**आनंदरावः**—स्त्रिया चिडल्या म्हणजे काय करतील त्याचा नेम नाहीं.

**सुभाताईः**—मला तरी तसेंच वाटतंय ! विनायकरावांनीं आपल्या बहिणीचा गुन्हा आपल्या आंगावर घेतला असावा.

**आनंदरावः**—ते कुठें आहेत सध्या ?

**सुभाताईः**—येरोड्यास तुरुंगात आहेत ! सुटले म्हणजे कळेल खरा प्रकार काय घडला तो.

**आशाः**—मग कळवा हं ते काय सांगतील तें, आम्हाला !

त्यानंतर तो विषय तसाच अर्धवट राहिला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अकराच्या सुमारास आनंदरावांच्या एका चहात्यानें त्यांना बातमी दिली...

"आंबेश्वराच्या देवळाच्या भिंतीवर कोणी एका उपद्व्याप्यानें एक हस्तलिखित पत्रिका डकविली होती. त्यांत तुमच्याविषयीं, नि नर्स सुभद्राबाई-बद्दल वाटेल तो मजकूर लिहिलेला आहे. केलेलें पाप निस्तरण्यासाटीं नर्सबाई नुकत्याच पंढरपूरला जाऊन आल्याची खात्रीची बातमी त्यानें तांबड्या अक्षरांत दिली आहे"

हें ऐकतांच आनंदराव स्तंभित झाले.

**आनंदरावः**—वेडे आहेत झालं लोक !

असें कांहीं तरी बोलून त्यांनीं आपल्या त्या मित्राला रवाना केला... पण त्या सर्व दिवसभर त्यांना त्यांना चैन कसें तें मुळींच पडेना ! रात्रीच्या निवांत वेळीं त्यांनीं तें अशुभ वृत्त आशेला थोडक्यांत निवेदन केलें.

ती त्यांच्या खांद्यावर मान टाकून रडली. दुसरें काय करणार बिचारी ?

**आशाः**—दुष्ट आहेत मेले लोक !

शेवटीं तिला रहावलें नाहींच. ती उद्गारली.

**आनंदराव**:—काय करायचं त्याला ? चालायचंच असें आशू...माणसानें आपलें मन गेंड्याच्या कातडीप्रमाणें घट्ट करायला शिकलें पाहिजे...समाजाचा हा मोठा थोरला गाडा चाललाय...आस्ते आस्ते चाललाय—त्याच्या चाकाच्या धावेखालचा प्रत्येक दगड अथवा खडा चिरडला जातोच असें नाहीं.. एकदा अगदीं कडक निघतोच नाहीं तरी—

अशा रीतीनें एकमेकांनीं परस्परांचें समाधान केलें. दोघांचीहि भारावलेंलीं मनें हलकीं झालीं...पावसानंतरच्या शीतलतेनें हिरव्यागार झाडाझुडुपांवर तरळणारी रम्यता तेथें भासूं लागली.

**आशा**:—इकडच्याविषयीं असें बोलतात—नि भय्यासाहेबाविषयीं पण कांहींतरी काहूर उठवलंय लोकांनीं गांवभर—

**आनंदराव**:—बोललीस नाहीं कुठें तें ? काय आहे तें ?

**आशा**:—मलाहि खरें वाटत नाहीं म्हणून मी सांगितलं नाहीं इकडे—नि खरं म्हणाल तर मी तें ऐकल्याबरोबर विसरून पण गेलें होतें.

**आनंदराव**:—काय ती हकीकत आहे ?

**आशा**:—म्हणे, सुशिलाबाईंना ब्लाउझ शिवण्यासाठीं भय्यासाहेबांनीं एक शिंपी घरीं बोलवला होता. काशीकरांच्या यमूच्या ब्लाउझसारखा त्यानें त्यांचा ब्लाउझ शिवावा म्हणून भय्यासाहेबांनीं यमूकडे निरोप पाठवून तिला त्या विशिष्ट पोलक्यासह बोलावून घेतली. आपलें कापड आणण्यासाठीं सुशिलाबाई आंत गेल्या होत्या. "किती–किती सुंदर कापड आहे यमूताई. तुझ्या या पोलक्याचें !" असें म्हणत म्हणे भय्यासाहेबांनीं यमूच्या खांद्यावरच्या फुगीर पोलक्याला हात लावला—नि तें त्या शिंप्यादेखत ! असें काय कोण करील कांहो ? नि त्यावरून लोकांनीं एकाचे दोन करून त्यांच्याविषयीं जें बोलूं नये तें बोललें जात आहे...गेल्या आठवड्यांत बॅडमिंटन् कोर्टवर माझ्याशिवाय कुणीच फिरकलें नाहीं. मला बाई भीति वाटते–आमच्या वनितामण्डळावर याचा परिणाम न होवो म्हणजे झालें.

ही हकीकत ऐकून आनंदरावांना विषाद वाटला नि खरोखरच भय्यासाहेबांनीं यमूच्या पोलक्याच्या कापडाला स्पर्श केला असला तरी त्यावरून

इतका पराचा कावळा करण्यासारखें असें त्यांत कांहींच नव्हतें. एरव्हीं एकदा डोंगराप्रमाणें स्थिर राहणारा समाज एकाद्याच्या अशा वैगुण्यावर आपली कल्पनाशक्ति अचाटपणें चालवूं शकतो-यांचें कारण काय याचा तें विचार करूं लागले.

मध्यंतरीं चार पांच दिवस उलटून गेले होतें. यमूला तिच्या नवऱ्यानें बेदम मारल्याचें वृत्त तोंडोतोंडी चटकदारपणें वर्णिलें जाऊं लागलें होतें. नि तें आनंदरावांपर्यंत पोंचण्यास वेळ लागला नाहीं...आशेला तें ऐकून वाईट वाटलें.

**आशा:**—गेले दोन दिवस बॅडमिंटन कोर्टवर खेळायला आली होती बिचारी...

**आनंदराव:**—नि त्याचेंच बक्षिस तिच्या त्या आडमोड नवरोजीनें तिला दिलेलें दिसतंय...असले लोक आपला राग-नि मत्सर आवरूं शकत नाहींत. त्याचें उट्टें ते आपल्या पत्नीवर काढतात...दुसरें तरी कोणतें शौर्य गाजविणार हे लोक ?

**आशा:**—मेलें आम्हा बायकांचें जिणेच वाईट. जगायचं तरी कसं आम्हीं ?

**आनंदराव:**—पण मी म्हणतों एकाद्या नवऱ्यानें आपल्या बायकोला मारलें-तर त्यांत एवढा रस कां वाटतो लोकांना ? माणूस माणसाला मारतो या सत्याबद्दल शरम वाटायला हवी खरं म्हटलं तर...नि ती पतीपत्नींची खासगी बाब असते. त्यांत लोकांना पडण्याचें तरी कारण काय असतं ? सगळंच विचित्र आहे !

**आशा:**—खरंच बाई ! कच्ची कैरी उकडली तरी आंबट लागायचीच ! कांहींहि करा, समाजाला ढम म्हणून नाहीं.

**आनंदराव:**—खरं म्हटलं तर, समाज म्हणजे रुळलेल्या पायवाटेच्या बाहेर जाणाऱ्या धीट माणसांला सावचितपणें गिळून टाकणारा अजगर आहे.

आशा किंचित् हंसली...त्या दोघांनीं नंतर दुसराच विषय काढून त्या वेळेचे आलेले मनावरचें दडपण कमी करण्याचा यत्न केला...

त्याच दिवसाची गोष्ट ! भय्यासाहेब कोर्टात गेले न गेले तोंच सुशिलाबाई लगबगीनें आशेकडे आल्या. त्यांनीं आनंदरावांना बोलवून घेतलें !

**सुशिलाबाई:**—कांहो ! यमूला मारलें तिच्या नवऱ्यानें म्हणतात—खरें कां ?

आनंदराव कधीं नाहीं ते आज सरळ निमूट बसून राहिले होते. त्यांच्या पुढें उभा असलेला पेंच आशेनें ओळखला.

**आशा:**—नकळे बाई !

**सुशिलाबाई:**—पण मला कळलंय कीं...

**आशा:**—तुम्हीं किती लोकांच्या कुत्सित तोंडाला लागणार ? नि लागून लागून तरी किती लागणार मेलें माणूस.

सुशिलाबाई जरा वेळ शांतपणें बसून राहिल्या.

**आनंदराव:**—आश् ! देग चहाचं सामान काढून...आज यांच्या हातचा चहा प्यायचा आपण—सुंदर करतात या !

आनंदरावांनीं विषय मुद्दामच बदलला हें सुशिलाबाईनीं ओळखलें. त्या चहाच्या तयारीला लागल्या.

चहा झाला. तीं तिघेंजणं तो घेऊं लागलीं.

**आशा:**—किती रुचकर करतां तुम्हीं चहा बाई ! शिकवा तरी मला. इकडे फार आवडतो असा चहा ! नेहमीं तुमचं नांव घेतात चहा पितांना !

**आनंदराव:**—मला वाटतं–अलिकडे कॉलेजमध्यें चहा कसा करावा याचें प्रात्यक्षिक देत असतील...खरं म्हटलें तर पाकशास्त्र हा स्वतंत्र विषय स्त्रियांसाठीं म्हणून युनिव्हर्सिटीनें ठेवला पाहिजे !

**सुशिलाबाई:**—यांत कशाला परीक्षा पास व्हायला हवेंय ? संवयीनें सर्व कांहीं जमतें.

**आशा:**—नि जर खरोखरच परीक्षा पास झालां...तर चहाचें अमृत कराल बाई तुम्हीं—!

**सुशिलाबाई:**—चला ! किती स्तुति करायची मेली कुणास ठाऊक ? तुम्हीं दोघंजणें फार लाघवी आहां हे मला माहित नाहीं वाटतें ? नि मला

हंसवून, आनंदानें परत पाठवून द्यायची तुमची युक्ति मी ओळखत नाहीं वाटतें ?

आशा आनंदराव हंसले. सुशिलाबाई पण हंसल्या—त्यांची वृत्ति जरा आनंदली होती. त्या ज्या चिंताक्रांत मनःस्थितींत त्यांच्याकडे आल्या होत्या ती पार निवळून गेली होती...आतां हास्याचा प्रकाश पसरूं लागला होता त्यांच्या हृदयांत—नि त्याचा फायदा घेऊन आनंदरावांची अनेक गोष्टी काढून त्यांना खूप हंसवलें...

दुपारचे दोन वाजण्याची वेळ टळून गेली. भय्यासाहेबांना फराळ पाठविण्याची वेळ होती ती. शिवाय त्यांची छोटी बेबी जागी होऊन कदाचित् रडत असेल असें वाटून सुशिलाबाई घरीं जाण्यास उठल्या.

**आनंदराव:**—एक गोष्ट विचारूं का सुशिलाबाई तुम्हाला ?

सुशिलाबाई स्तंभितच झाल्या. आनंदरावाच्या तोंडाकडे बघतच राहिल्या त्या.

**आनंदराव:**—भय्यासाहेब कचेरींत गेले, नि तुम्ही आमच्याकडे येतां. हें त्यांना माहीत आहे ?

**सुशिलाबाई:**—कां ? नाहीं. मला ते येऊं द्यायचे नाहींत.

**आनंदराव:**—कां येऊं देणार नाहींत हें तुम्ही जाणतांच—तर मग...मग त्यांच्या नकळत......माझ्याकडे येणें तुमच्या सुखाचें ठरणार नाहीं. खरें ना ?

**सुशिलाबाई:**—नका हो असे निष्ठूर होऊं आनंदराव.

असें म्हणत असणाऱ्या सुशिलाबाईंच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. त्यांनीं ते आपल्या पदरानें टिपून काढले. आनंरावांना हें पाहवलें नाहीं.

**आनंदराव:**—दर चार दोन दिवसांनीं आशा येत जाईल तुमच्याकडे.

असें बोलत आनंदराव तेथून माडीवरील आपल्या लिहिण्याच्या खोलीकडे निघून गेले......

**आशा:**—थांबा ! मी कुंकू लावतें तुम्हाला......काय करायचें ? गांवढळ रस्त्यांतून आपण प्रवास करतों आहोंत...त्याची धूळ उसळत असतांना तोंडावर रुमाल न धरून कसं चालेल ?

# ६

आंबेगांवांतील तें साल म्युनिसिपल निवडणुकीचें होते. त्यामुळें शहरांतील एका विशिष्ट थराच्या लोकांची जोराची हाल चाल सुरू झाली होती. निवडणुकीसाठीं उभे करावयाचे उमेदवार ते त्या निवडनुकीनंतर नगरपालिकेचे अध्यक्ष कोण होऊं शकतील याचा अडाखा बांधून उभे केले जातात. या आखाड्याला व्यत्यय आणणारा असा एकादा स्वतंत्र उमेदार उभा राहिलाच तर त्याचा पाडाव कसा करतां येईल याचें गणित करून त्याच्या भोंवतीं अडचणींचे पाश उभे राहावेत म्हणून, त्याच्याशीं चढाओढ करणारीं उमेदवार–बाहुलीं उभारलीं जातात. दोन पक्षांमधील भांडणें एकाद्या पक्षांतील पण कर्तबगार अशा स्वतंत्र माणसाला पुढें यायचें असल्यास अशा तऱ्हेनें मारक ठरतात शिवाय जे पक्षोपक्ष आपापले उमेदवार उभे करतात त्यांच्यामागें कांहीं विशिष्ट असा ध्येयावादी कार्यक्रम असतो म्हणावें तर तेंहि नाहीं आंबेगांवच्या निवडणुकीच्या वेळीं ब्राह्मण ब्राह्मणेतर असा वाद दर तीन वर्षांनीं उतास येतो त्यावेळीं सुदृढ राष्ट्रीय वृत्तीचा असा पक्ष निवडणुकी लढविण्यासाठीं पुढें येणें महाकठीण काम होई...अर्थात आनंदरावांना अशा निवडणुकींत भाग घेऊन एक जात दुसऱ्याविरुद्ध चेतविण्यास, एक वर्ग दुसऱ्याविरुद्ध चढाईला उत्सुक करण्यांस किंवा ब्राह्मणविरुद्ध अब्राह्मण असा भेद करून भांडणाला आलेला रंग अवलोकण्यास

केंव्हांहि तयार नसत...अशाच एका रंगीबेरंगी पक्षाच्या पुढाऱ्यानें आनंदरावांना यंदाच्या निवडणुकीस उभें राहावें म्हणून त्यांना आग्रह केला. त्यावेळीं ते अशा कोणत्याहि अराष्ट्रीय वृत्तीला आपल्या आचरणानें पोसण्यास तयार नसल्याचें त्यांनीं स्पष्ट सांगितलें. त्या सद्‌गृहस्थांनीं उलट आपलेंच म्हणणें बिचाऱ्या आनंदरावांच्या गळीं उतरविण्याचा खटाटोप केला, म्हणून तो निष्फळ करण्यासाठीं आनंदरावांना त्यांच्याशीं दोन तास शुष्क काथ्याकुट करावा लागला होता. या सकाळच्या प्रसंगानें त्यांचें मस्तक तापून निराशावादाच्या क्षणिक आहारीं गेल्यामुळें त्यांचें मन उद्विग्न झालें होतें त्यामुळें दुपारीं जेवणें होतांच त्यांनीं निद्रादेवीची आराधना केली. ते चार वाजल्यानंतर उठून आळसावलेल्या वृत्तीनें कसातरी आपला वेळ घालवीत होते.

त्या दिवशीं आशेला सायंकाळच्या सैंपाकाची काळजी नव्हती. आनंदरावांना घरीं बसून राहणें अशक्य झालें होतें म्हणून तीं पतीपत्नी सायंकाळचें फिरण्यास म्हणून बाहेर पडलीं होतीं. आक्टोबरचा उष्मा सुरू झाला होता. त्यामुळें होणारी तगमग कांहीं कमी होत नव्हती. म्हणून ते नदीच्या काठाकाठानें कसलेसें बोलणें करीत रेंगाळत चालले होते.

बापरे ! तोंच आंबेगांवच्या हायस्कूलच्या हेडमास्तरांच्या सौभाग्यवती रमाबाई समोरून येतांना त्यांच्या दृष्टीस पडल्या ! आलीच आहे वेळ तर त्यांच्याशीं मामुली चारदोन शब्द बोलून त्यांना चुकविण्याचा आशेचा इरादा होता. वनिता मंडळामुळें त्यांचा परिचय झाला होता. त्यामुळें तिला थांबणें भागच पडलें.

वाटेंत आशा थांबली म्हणून आनंदरावहि थबकले. रमाबाईनीं त्यांच्याकडे दृष्टिक्षेप करतांच आनंदरावांनीं त्यांना नमस्कार केला नि नेहमीच्या संवयीप्रमाणें त्यांनीं थोडेसें स्मितहि केलें. पण त्या बाईचा गंभीर असा प्रश्नार्थक चेहरा पाहून आनंदराव दुसरीकडे पाहूं लागले.

रमाबाईचें बोलणें रात्रभर सोडून ठेवलेल्या नळाप्रमाणें चाललें होतें. तो नळ वाटल्यास बंद करतां येतो पण...त्यांना थांबा म्हणून आशेनें म्हणायचें कसें ?

आशेची सुटका केव्हां होते याची वाट बघत ते पांचपंचवीस पावलें रस्ता चालून पुढें निघूनहि गेले. संध्याकाळीं आकाशांत तरंगणाऱ्या असंख्य ढगाप्रमाणें त्यांच्या मनांत निरनिराळे विचार आले नि विरून पण गेले. त्यांचें तें रेंगाळणें चाललेंच होतें.

आशेचा जवळ जवळ अर्धा तास रमाबाईंनीं सपशेल खाल्ला. ती येतांना दिसतांच आनंदरावांनीं एक सुटकेचा श्वास सोडला.

**आनंदराव:**—संपलें एकदांचें कां वनितामंडळाचें राजकारण ?

**आशा:**—शी...शी...दमलें बाई तेंच तें बोलणें ऐकतांना त्यांचें ! दूर पळून तरी जाऊं...नाहीं तर......

**आनंदराव:**—अगदीं पिंजऱ्यांत अडकली होतीस जणूं ?

**आशा:**—नाहींतर काय ?

**आनंदराव:**—पण एवढी बोलली तरी काय ती ?

**आशा:**—किती कुजक्या वृत्तीच्या स्त्रिया असतात देव जाणे !

**आनंदराव:**— स्त्रियांविषयीं असें बोलणें बरें नाहीं, आशू !

**आशा:**—नाहींतर काय ? मागच्या अध्यक्षीणबाईच्या उखाळ्या पाखाळ्या काढून त्यांचा उद्धार करीत होत्या रमाबाई ! सुशिलाबाईनीं यांना अध्यक्ष न करतां यंदा मुनसबीण बाईंना ती संधी देऊन त्या दोघींच्या भांडणांचें मूळ काढून टाकलें. तरी या म्हणतात सुशिलाबाईनीं यानांच कां अध्यक्षीण निवडली नाहीं. पूर्वीच्या बाईचें चांगलें नाक ठेंचायचें होतें या बाईंना.

**आनंदराव:**—सुशिलाबाईनीं कशाला उगाच यांना दुखवलें ? केलें असतें यांना अध्यक्ष तर—शोभा तरी आली असती.

**आशा:**—अहो पण ताळतंत्र राखतां येण्याइतकी तरी बुद्धी आहे कां यांना ? मंडळांत पाऊल टाकलें म्हणजे भांडायला लागतात ! कारण का लागतें यांना ? नि मुनसबीणबाईची योग्यता कुठें नि—

**आनंदराव:**—तुला नाहीं का दिल्या शिव्या तुझ्या तोंडावर ?

**आशा:**—मला नाहीं. पण बिचाऱ्या सुशिलाबाईना बरं म्हणवलें नाहीं या बाईला.

**आनंदरावः**—शिव्या श्राप घेतल्यावांचून उगाच का मोठेपण मिळतें ?

**आशाः**—कोण देतंय कुणाला मोठेपणा ? वाटेवर नाहीं पडला. रमाबाई-सारख्या स्त्रिया आपल्या पुरताच विचार करतात त्यामुळें क्षुद्र विषयांवर बायकांचीं रणें माजतात. आकांडतांडव करतात अगदीं...! स्वार्थाशिवाय नि स्वतःच्या बडिजावाशिवाय दुसरें तिसरें कांहींच दिसत नाहीं. जगण्यासारखें आकर्षक, सुंदर नि आनंददायक असें नवीन जग आपण आपल्या समंजसपणानें उत्पन्न करूं याची त्यांना कल्पनासुद्धां शिवलेली दिसत नाहीं....या बाबतींत कांहीं विचार करायला हवाय् याची त्यांना जाणीव नाहीं. खरं म्हटलें तर मुंबई–पुण्यांतील स्त्रिया नि आंबेगांवासारख्या शहरांतील स्त्रिया यांच्यामध्यें वृत्तींचें, आचाराचें, विचाराचें, नि स्त्रीत्वाचें असें चारपांच पिढ्यांचे अंतर दिसून येतें. नि अशा सर्रास स्त्रिया आहेत म्हणून तर पुरुषांना बोलायला झालंय् "स्त्रियांची अक्कल चुलीपुरती" !

**आनंदरावः**—पण तुम्हीं काढलंय् ना वनितामंडळ, त्यांना सुधारण्यासाठीं ?

**आशाः**—हंसायला कशाला हवंय् ! आमचें मंडळ म्हणजे कांहीं यंत्र नाहीं. अशीं हजारों मंडळें निघून तीं टिकलीं पाहिजेत. चांललीं पाहिजेत...

**आनंदराव**:—टिकलीं पाहिजे हें मात्र खरें आहे !

**आशाः**—म्हणजे परस्परांनीं समजून घेऊन आपल्या वृत्ती इतरांशीं जुळवून घेण्याची संवय तरी लागेल स्त्रियांना !

**आनंदरावः**—जाऊं दे तें बायकांचें पुराण ! तो पलीकडचा ढग बघ ! आंतून कापसासारखा पांढरा असून त्याच्या कडा कशा सोनेरी झाल्या आहेत ! नि तें पहा त्याचें तें निमूळतें हत्तीच्या सोंडे सारखें तोंड कसें लालसर झालेलें किती सुंदर आहे, नाहीं ?

आशा त्या ढगाकडे बघतच राहिली.

**आनंदरावः**—कां ? बोलत नाहींस तूं आशू ?

**आशाः**—नि तो थोड्या वेळानें सर्वच काळा होणार आहे.

**आनंदरावः**—आज अशी निराश कां तूं ?

**आशा:**—निराश नाहीं मी ! स्त्रियांचें सौंदर्य नाहीसें झाल्यावर काय उरतें ?

**आनंदराव:**—चूप आतां मी बोलूं देणार नाहीं तुला पुढें !

कितीतरी वेळ तें जोडपें न बोलतांच चाललें होतें.

त्यानंतर एक आठवड्यानंतची हकीगत. आनंदराव कुठूनसे घरांत आले होते. आपले कपडे काढून ते हातपाय धुण्यासाठीं स्नानगृहांत गेले. बाहेर येऊन पाहातात तो समोरच्या दरवाज्यांतून सुशिलाबाई आंत येतांना दिसल्या.

**आनंदराव:**—कांहो, या वेळीं !

**सुशिलाबाई:**—ही का अवेळ ? म्हटलें, तीन वाजून गेलेत साहेब ! तुमच्या चहाची वेळ झालीय्. म्हटलं जावं वेळेवर आयता प्यायला.

**आनंदराव:**—पण...पण...

**सुशिलाबाई:**—पण काय ? म्हणजे आम्ही तुमच्याकडे येऊंच नये कीं काय ? असं हो काय करतां आनंदराव ? माणसाला हंसल्या हंसविल्याशिवाय जगतां येते वाटतें ? असल्यास सांगा तरी तो उपाय ! म्हणजे तुमच्याकडे मी यायचीं नाहीं. नि भीतीही वाटायला नको कुणाला जगाची !

**आनंदराव:**—बरं बरं ! मी कुठें कांहीं म्हटलं का !

**सुशिलाबाई:**—पण मी मात्र तुम्हांला आज न हंसवितांच जाणार आहे.

**आनंदराव:**—आहे तरी काय तुमच्या पोतडींत आज ? घरीं कांहीं कमी जास्त झालें तर नाहीं ?

**सुशिलाबाई:**—तसें विशेष नाहीं. कालचा रविवार होता ब्रिजचा अभिषेक सबंध दिवसभर सुरूं होता. त्या वेळीं तिकडच्या मित्रमंडळींत बोलणें निघालें तर सहजगत्या माझ्या कानावर पडलें. ते म्हणत होते कीं मागें जनाबाईनें मरतांना तुमचें नांव घेतलें. खरं का हो ?

**आनंदराव:**—मग त्यांत काय एवढं विशेष झालं.

**आशा:**—चहा ठेवतें हं, जायचं नाहीं आल्यापावलीं परत—

**सुशिलाबाईः**—पण त्याचा भलताच अर्थ लावतात लोक गांवभर.

**आनंदरावः**—मूर्ख आहेत लोक. त्यांना विचारतो कोण ? पण भय्यासाहेब कसें कांहींच बोलले नाहींत ? त्यांना मी एकदां खरी हकीकत सांगितली होती.

**सुशिलाबाईः**—कांहीं नाहीं बोलले ते !

**आनंदरावः**—अस्सें ?

आंबेगांवांतील पुरुषोत्तम मराठे हे चांगले धनिक असे जमीनदार गणले जात होते. त्यांच्या कुळारकी गांवाहून एक जना नांवाची तरुण विधवा आपल्या दिरावर पोटगीचा दावा लावण्याच्या विचारानें पुरुषोत्तम मराठे यांचा सल्ला घेण्यास आली होती. त्यांनीं तिच्यासाठीं तिच्या दिरावर दावा घालून तिची पोटगी वसूल होईपर्यंत होईल तो खर्च करण्याचें तिला कबूल केलें. दावा चालू झाला. ती आंबेगांवांतील एका आडवस्तींत राहूं लागली... तिच्यावर येऊं नये तो प्रसंग आला...त्यांतून सुटका करून घेण्यासाठीं तिनें कसलेसें उष्ण औषध प्राशन केलें होतें. मरणापूर्वी आठ तास ती आंगाच्या होणाऱ्या आगीनें सारखी तडफडत होती. त्यावेळीं पोलिसांनीं तिचा जबाब घेतला तेव्हां तिनें श्रीमंत मराठे यांचें नांव घेतलें होतें. आणखी कोण तुम्हांला कधीं भेटायला आले होते ? असें पोलिसांनीं नेहमीच्या मामुली पद्धतीनें जनाबाईला विचारतांच आनंदराव मनोहर वैद्य येऊन गेल्याचें तिनें सांगितलें होतें.

**सुशिलाबाईः**—पण तुम्ही अशा बाईकडे गेलां होतां कशाला ?

**आनंदरावः**—सांगतो ना ! मला कळलं कीं ती संकटांत सांपडली आहे. मी माझ्या एका स्नेह्याला घेऊन तिचें बिऱ्हाड शोधून काढलें ती जर कांहीं अडचणींत असेल तर तिला मुंबईच्या एकाद्या अनाथ महिलाश्रमामध्यें नेऊन तिची सुटका करूं शकेन असें मी तिला समजावून सांगितलें.

**सुशिलाबाईः**—नि ती काय म्हणाली मग ?

**आनंदरावः**—म्हणाली, ‘ भलतंच कसलें कुभांड आणतां तुम्ही माझ्यावर... ? ’ मी नंतर तिच्याशीं विशेषसें बोललोंहि नाहीं, त्यानंतर ती

वारली तेव्हां मला तिची हकीकत कळली...

**सुशिलाबाई**:—हा भलेपणा तुमच्या आंगाशीं आला तर ?

**आनंदराव**:—म्हणून माणुसकी सोडायची कशी ?

**आशा**:—पण मी त्याच वेळीं इकडे सांगितलें होतें कीं जाऊं नका भलत्याच गोष्टींत लक्ष घालायला.

**आनंदराव**:—आशू ! तूं हें बोलावंस याचं नवल वाटतें मला. स्त्रियांवर निसर्गानें अन्याय केलेला, त्यांत त्या दुबळ्या-पुरुषी कायद्यानें आम्हीं त्यांना जखडून टाकलेल्या...अशा परिस्थितींत माणसांनीं माणुसकी न दाखविण्याचा निष्ठूरपणा करावा ?

**आशा**:—पण माणसानें कनवाळूपणाला मर्यादा घातल्या नाहीं तर—

**आनंदराव**:—मला आपलें वाटतें, कनवाळूपणा-दया-अमर्यादच राहावी माणसांमाणसामध्यें.

**आशा**:—मग असा प्रवाद उठतो ना ? तुम्हांला काय ?

**आनंदराव**:—आशू मला वाटतें माझ्या विषयींच्या मायेनें तूं आज स्वार्थी झालेली दिसतेस ! खरें म्हणशील तर मला मात्र यांत कांहींच वाटत नाहीं. मी कसा आहे हे गांवाला पक्कें माहीत आहे...वरवरच्या वाटा आहेत या—त्यांना कां घाबरायचें ?

**आशा**:—माहीत आहे मोठे स्थितप्रज्ञ आहां तें !

**आनंदराव**:—नाहींच मी ! तुझ्या बाबतींत माझें मन स्थिर राहात नाहीं आशू हें तुला माहीत आहे. तुझ्या अगदीं मी मुठींत असतों हें सुशिलाबाईनासुद्धां माहीत आहे.

**आशा**:—घ्या ! यांचें आपलें भलतेंच कांहींतरी.

आशा किंचित् लाजली. सुशिलाबाई मात्र हंसल्या बोलतां बोलतां त्या तिघांचा चहा केव्हांच आटोपला होता. कपबशा धुवून आशेनें रॅकवर नेऊन लावून ठेवल्या नि सायंकाळच्या उसळीसाठीं भिजत घातलेले वाल काढून ती ते निवडूं लागली.

त्यांतील एक भाग आपल्यापाशीं घेऊन सुशिलाबाई ते वाल निवडूं

लागल्या. ते निवडीत असतांना त्यांच्या गप्पा सुरू झाल्या थोडावेळ जातो न जातो तोंच सुभाताई पांढऱ्या स्वच्छ पातळाचा दिमाख मिरवीत तेथें येऊन थडकल्या.

**आनंदराव**:—आहे बुवा ! अगदीं पूर्णपणें गाळलेला सूर्यप्रकाश दिसतोय यांच्या अंगावर !

**आशा**:—पण गोऱ्या माणसांना पांढरे पातळ शोभत नाहीं म्हणतात.

**सुभाताई**:—नि गोऱ्या माणसांना जगायचं असतं म्हटलं.

सुभाताईनें तेथचा पाट घेतला नि त्यावर त्या बसल्या.

**सुभाताई**:—म्हटलं आतां बोलाना !

**सुशिलाबाई**:—तुम्ही एकट्याच जगांत जगतां वाटतं ?

**सुभाताई**:—कां हो. माझें बोलणें झोंबलें वाटतें ? मी कुठें म्हणतेंय कीं तुम्ही काळसर आहां म्हणून !

**सुशिलाबाई**:—इश्श ! मी का माझ्याविषयीं बोललें ? नि मी काळी का आहें ? कमाल आहे तुमची !

**आनंदराव**:—ताई अशाच एकादे वेळेस अगदीं आंगचट बोलतात.

**सुभाताई**:—सांभाळा हं आनंदराव बोललें म्हणजे लागेल तुम्हांला.

आशा मुद्दामच खोकली...नि सुभाताईकडे बघत हंसली.

**सुभाताई**:—माहीत आहे. तूं त्यांची बायको आहेस कीं—एवढी जाहिरात नको करायला कांहीं...

**आशा**:—आम्हीं नाहीं करीत कशाची जाहिरात. तुम्हांलाच करावी लागते आपली जाहिरात–हें तुमचें पांढरें पातळ...!!

**सुभाताई**:—नि हें तुमचें कुंकू !!

आतां मात्र आनंदरावांसह त्या तिघीजणी अगदीं पोट धरधरून हंसल्या—

**सुभाताई**:—उठ बाई–उठ. दमून आलेंय मी. कांहीं विचारशील कीं नाहीं मला ? म्हण तरी चहा घेणार कां ?

**आशा**:—चहा हवा होता तर वेळेवर यायचें—

**सुभाताई**:—उठ बाळ—आशू—माझी बाळ ती उठ ना ग—किती छान छान आहे माझी छकुली ती !!!

**आशा**:—इश्श !

**सुशिलाबाई**:—तुम्हांला हवाय ना चहा. मी देतें करून—

त्यांनीं तेथचा स्टोव्ह पुढें घेतला. त्यांनीं काकडा पेटवून लावला आणि पातेल्यांत पाणी घेण्यासाठीं त्या उठून पाण्याजवळ गेल्या.

**सुभाताई**:—ही पण माझी गुणी बाळ आहे हं आनंदराव !

**आशा**:—संभाळा हो सुशिलाबाई ! ताई आज भारीच खूष दिसताहेत.

**सुभाताई**:—खूष नाहीं मी...तुम्हांला जाब विचारायला आलेय मी माझी ड्यूटी सोडून ! समजलं आनंदराव ?

**आनंदराव**:—अरे वा ! चहा मिळणार म्हणून आघाडी बदलली वाटतें ?

**सुभाताई**:—आतां करतेंच तोफांचा भडिमार सुरू...तुम्हीं काय समजलां, आनंदराव ! या. असे उभे राहा...नको बाई...खरोखरच तुम्हीं उभे राहाल...बसा–तिथेंच बसा...हं. ठीक...आरोप नंबर एक...रस्त्यांत तुम्हीं दुसऱ्यांच्या बायकांना गांठून त्यांच्याकडे निरखीत उभे राहतां—खरें आहे कीं नाहीं ?

आशा व सुशिलाबाई मनापासून हंसल्या ताईचा हा नवा अवतार पाहून !! हें काय लफडें आहे या साशंकतेनें आनंदराव निश्चल राहिले.

**सुभाताई**:—प्रश्न नंबर दोन...पण तो ठेवतें सध्यां.

जरा वेळ बाजूला... पहिल्याचे उत्तर या अगोदर काय तें !

**सुशिलाबाई**:—पण कुणी केलाय हा आरोप त्यांच्यावर ?

**सुभाताई**:—आला वाटतं कढ आपल्या मित्राचा ?

**आनंदराव**:—पण मी कुणाकडे पाहिलें निरखून ?

**आशा**:—नि कोण एवढें सुंदर आहे आपल्या गांवांत ?

**सुभाताई**:—एवढा नको कांहीं मीपणा दाखवयला. गर्वाचें घर खालीं असतें—लक्षांत ठेवा आशाबाई ऽऽ !

**सुशिलाबाई**:—पुरे झालें मेलें. काय तें सांगाना ताई एकदां—

**सुभाताई**:—आनंदराव ! आठ दहा दिवसापूर्वी रमाबाईंना फिरायला जातांना वाटेंत गांठून तुम्ही...

**सुशिलाबाई**:—बाई ! बाई ! बाई ! ! कोणाला धैर्य होईल त्या गोकुळच्या मथुरेकडे पाह्यचें ?

**आशा**:—पण मी होतें ना इकडच्या बरोबर त्यावेळीं.

**सुभाताई**:—तुमचे ते आधुनिक तंत्र आहे म्हणे आनंदराव !

परस्त्रीला आपल्या बायकोशीं बोलायला लावायचें नि आपण चारी बाजूला हिंडून त्या बाईला निरखून पाह्यचे.

**आशा**:—असें असें ! सुशिलाबाईंना माझ्या तोंडावर बोलली. आतां तुमच्यापाशीं माझा थोडाफार उद्धार झाला वाटतें ?

**सुभाताई**:—तुझा नाहीं—उगाच आपल्या अंगावर ओढून घेऊं नकोस तूं कांहीं हं...आनंदराव ही भलतीच घाणेरडी—नि असभ्य संवय लौकरच सोडून द्या म्हटलें.

**सुशिलाबाई**:—आपण फार फार सुंदर आहोंत असें सरळ सरळ कां सांगत सुटत नाहींत रमाबाई ?

**आनंदराव**:—अहो पण ताई—तीच अर्धातासभर आशेशीं बोलत उभी होती. आशा केव्हां येते हें सहजपणें मी तिच्याकडे बघत होतों मधून मधून ! पण त्या माझ्या पाहण्याला त्या बाई समजतात तसा अर्थ मुळींच नव्हता—नि स्त्रीपुरुष परस्परांकडे पाहतात तेव्हां प्रत्येक वेळीं त्यांचा भलताच मनोदय असतो वाटतें ?

**सुभाताई**:—हां—हां—हां—बोलूं देणार नाही मी तुम्हांला... मागचें तुमचें जनाबाई प्रकरण सगळ्या गांवभर झालें होतें. मग तुमच्या नजरेचा अर्थ रमाबाईनीं तसा घेतला त्यांत त्यांचा काय दोष ?

**आनंदराव**:—तरीच ! त्यांनीं माझा नमस्कार सुद्धां घेतला नाहीं.

**सुभाताई**:—नमस्कार—त्यांना तुम्ही नमस्कार केला...? अहो करायचा तर सांष्टांग नमस्कार घालायचा त्यांना...नि त्या महादेवीचा आशीर्वाद

मागायचा कीं—

**आशाः**—पण तुम्हाला कुठें भेटल्या त्या ताई ?

**सुभाताईः**—त्यानींच मला बोलावून घेतलें होतें आज ! त्यांची पाळी चुकलीय्, म्हणाल्या तपासा !

**सुशिलाबाईः**—तपासलेंत त्यांना ?

**सुभाताईः**—वाढली कां तुमची जिज्ञासा ? पण मी सांगणारच नाहीं कीं रमाबाई गरोदर आहेत म्हणून...

पुन्हा त्या मंडळींत हस्याचा कल्लोळ उठला.

**आशाः**—रमाबाईचा पाळणा बऱ्याच वर्षांनंतर हालतोय् त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे मंडळांत...

**आनंदरावः**—हींच कामें करा तुम्हीं आपल्या मंडळांत...फुरसत मिळणार नाहीं तुम्हांला इतर कसलीं कामें करायला !

**सुभाताईः**—भारींच बाई उपदेश करीत सुटावयची संवय असते तुम्हां पुरुषांना ! तुम्हांलाच काय तें कळतं बरं आनंदराव बाकीची दुनिया मूर्ख आहे.

**आशाः**—पुन्हा आंगचटीला आलां तुम्ही ताई !

**सुभाताईः**—आनंदराव पहिला आरोप सिद्ध झाला ना ! आतां मात्र मला पंचाईत पडली आहे.

चहा पिऊन झाल्यावर सुभाताई कप बशी खालीं ठेवीत बोलल्या...

**आशाः**—कसली ?

**सुभाताईः**—माझ्या व्हिजिट बुकांत दुसरें नांव कुणाचें घालूं ? आज कुणाकुणाला तपासायला गेलें होतें हें लिहूं बरें ?

**सुशिलाबाईः**—तुमचें नांव घाला वाटल्यास.

**सुभाताईः**—तुमचेंच घालतें...तुमच्या बाबतींत खुद्द भय्यासाहेबांनासुद्धां खोटें वाटायचें नाहीं. कदाचित् पाह्यची पण जरूर नसेल...दिसतंयच तें ! !

**आशाः**—आहेत त्या तीन मुलांचे उरकतांना मढ्यास आल्यात सुशिलाबाई–आणखी नका लावूं त्यांच्या मागें काच !

**सुभाताईः**—मला कशाला ? हा उपदेश भय्यासाहेबांसाठीं राखून ठेव.

**आशाः**—खरंच–बाई–तुमचा सुरेश मला देऊन टाका—छान आहे तो सांभाळीन मी त्याला.

**आनंदरावः**—छान ! सुरेख ! सुरेशच्या पाठची माला ताईना देऊन टाका सुशिलाबाई ! म्हणजे वांटणी बरोबर घेईल.

**सुभाताईः**—मी कां अशी उधार–उसनवारी करीन कुणाची ? मला होणार नाहीं वाटतें ?

सुभाताई आपल्याच नादांत अगदीं कुर्‍यांनं बोलून गेल्या ...सारीं जणं हंसलीं तेव्हां आपली चूक त्यांच्या ध्यानांत आली...पण त्या डरल्या नाहींत... आपला चेहरा त्यांनीं जरा सुद्धां पडूं दिला नाहीं.

**सुशिलाबाईः**—इश्श ! जिभेला हाड तरी कांहीं !!

**आशाः**—भलतंच कसं बोलवतं ताई तुम्हांला ?

**सुभाताईः**—मग कशाला म्हणता ग तुम्ही मला नेहमी नेहमी, 'ताई लग्न करून घ्या म्हणून ?'

**आनंदरावः**—फारच दूरान्वयानें बोलतां कधीं कधीं तुम्ही ताई !

**सुशिलाबाईः**—पण आम्हाला नाहीं समजत असलीं बोलणीं.

**सुभाताईः**—ए हे रे कुकुलें बाळ !

**आशाः**—तें जाऊं द्या ताई...प्रश्न नंबर दोन दोन कुठचा तो सांगा ना !

**सुभाताईः**—तो फार फार गंभीर स्वरूपाचा आहे...म्हणे गांवांतील हेडनर्स श्री. सुभद्राबाई यांची नि श्रीयुत आनंद मनोहर वैद्य यांची दाट मैत्री आहे.

**आशाः**—आहेच म्हणावें... त्यांत काय खोटें आहे हो ? आशेनें अभिमानानें विचारलें.

**सुभाताईः**—काय म्हणावें आशा तुला ? समजतं कां तूं काय बोलतेस तें ?

**आशाः**—पण काय गैर आहे त्यांत ?

**सुभाताईः**—रमाबाईनीं सरळपणें मला विचारलें, 'असें जर आहे तर तुम्ही आनंदरावांशीं लग्न कां करीत नाहीं ? ' बोल आतां कां गप्प बसलीस तूं ?

**सुशिलाबाईः**—म्हणून आम्ही म्हणतों मी तुम्ही लग्न करून घ्या—म्हणजे असे कोण बोलणार नाहीं.

**सुभाताईः**—लोक बोलतात म्हणून का कोणाशी लग्न करणार आहें ? पण—पण कुणी माझ्यावर प्रेम करणारं भेटलें पाहिजे ना ?

या पुढचें ताईचें बोलणें कुणीच ऐकलें नाहीं. त्या सर्वांची हंसण्यानं त्रेधा उडाली.

---



आतां आपण किंचित् काल मागें दृष्टिक्षेप करीत आहों.

आनंदराव खाऊनपिऊन सुखी गृहस्थ होते. त्यांचे आजोबा वैद्यकी करीत म्हणून त्यांना वैद्य हें आडनांव पडून गेलें होतें. त्यांच्या वडिलांनीं कांहीं सावकारी व कांहीं शेती करून एकुलत्या एक चिरंजीवांना पुरेल एवढी माया मागें राखून ठेवली होती...आनंदरावांची निगर्वी नि सरळ वृत्ति लहानमोठ्यांत मिसळण्याचा त्यांचा स्वभाव नि होईल ती जनसेवा करीत राहण्यांचा त्यांचा निश्चय यामुळें ते गांवांत ओळखले जात होते. ते लोकप्रिय नव्हते तरी त्यांच्या चारित्र्यामुळें त्यांना भलेपणा प्राप्त झाला होता. गांवांत कोठेंही विनाकारण गप्पा मारीत आपला वेळ निरर्थक घालवीत बसण्यापेक्षां जमेल त्या

अध्ययनांत–वाचनांत ते आपला वेळ दवडीत. अशा त्यांच्या अध्ययनांतून त्यांचे विचार परिपक्व होत गेले, ते व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं लेखन कलेचा आश्रय घेतला. नि त्यांत त्यांनीं आपला जम बसविला. त्यांनीं लिहिलेलें वाङ्मय कोठें कोठें वाचलें जात होतें...भय्यासाहेब आंबेगांवाला येण्यापूर्वी त्यांनीं आनंदरावांचीं दोन तीन पुस्तकें वाचलीं होतीं......

आशेची निवड करण्यास त्यांच्या आईनें त्यांना मोकळीक दिली होती. त्यांचा तो प्रेम–विवाह नव्हता तरी आनंदरावांच्या सहज संस्कारक्षम मनोवृत्तिमुळें तो प्रेम–विवाहासारखा सुखकर ठरला होता. प्रेमळ नि मर्यादशील म्हणून तें जोडपें लोकांपुढें उदाहरण म्हणून होतें...पण गांवांत कुटाळ कंपूंना तें कसें मान्य व्हावें ?

आनंदराव सकाळीं आपल्या घरीं झोंपाळ्यावर बसून हॅक्सलेचें " एन्डस् ॲन्ड मीन्स " हें पुस्तक वाचीत होते. इतक्यांत शामराव नांवाचे एक मध्यम वयाचे गृहस्थ त्यांना भेटण्यास आले.

ज्या कोणा लोकांचें शामरावांशीं कांहींना कांहीं कारणामुळें पटत नसे, त्यांना ते म्हणजे एक उपद्व्यापी गृहस्थ वाटत असत कांहींना ते कोर्ट कचेरीच्या पायऱ्या चढून वारेमाप पैसे खर्च करणाऱ्या दोन्ही पक्षांमध्यें तडजोड घडवून आणणारे एक खटपटी गृहस्थ वाटत...गांवांतील लोकांपैकीं कोणाच्या काय भानगडी आहेत हें त्या भल्या गृहस्थाला पूर्णपणें अवगत असत नि त्यामुळें कुठं गप्पा निघाल्या म्हणजे त्यांना ताळतंत्र न राहून कोणाविषयीं काय बोलावें नि काय नाहीं, याचा त्यांना सुमार राहात नसे.

अशा त्या वल्लीला पाहून आनंदराव नाहीं म्हटलें तरी थोडेसे चपापलेच !

**आनंदराव**:—या—बसा—कां आलांत काका ?

**शामराव**:—ह्यः ह्यः ह्यः ! कांहीं विशेष नाहीं. आलों आपला असाच तुमच्याकडे का ? येऊं नये कीं काय ?

**आनंदराव**:—चहा घेणार ना ?

**शामराव**:—वा-वा-वा! तो तर अगोदर पाहिजे बुवा आपल्याला तुमच्याकडचा चहा नामांकित असतो हें आमच्या कानापर्यंत आलंय् म्हटलं साहेब ?

शामराव अगदीं ओरडून आपला घसा खरडून बोलत होते. पण त्यांचें नेहमीचेंच बोलणें अगदीं पंचमांत असतें हें आनंदरावांना माहित होतें...

इकडच्या तिकडच्या निरर्थक गप्पा निघणें अगदीं अपरिहार्य होतें. शामराव कांहीं तरी हेतूनें आले असून ते आपला आशय जेव्हां व्यक्त करतील तेव्हांच तो ऐकून घेणें श्रेयस्कर उगाच जिज्ञासा व्यत करण्यांत हंशील नाहीं हें जाणून आनंदराव त्यांच्याशीं बोलून आपला वेळ फुकट घालवींत होते.

**शामराव**:—परवा म्हणजे मागें बरेच दिवसापूर्वी...तुमच्याविषयीं कसलीशी पाटी आंबेश्वराच्या सभामंडपांत लावली होती! काय हरामखोर लोक असतात हो ?

**आनंदराव**:—चालायचेंच ! कोण कुणाचे हात धरूं शकतो ?

**शामराव**:—म्हणजे ! असें कधीं झालेंय ? आनंदराव—! कोणी ती पाटी लिहिली, कोणी तेथें ती लावली याची बित्तं बातमी आहे म्हटलं आमच्यापाशीं. तुम्हीं सांगत असाल तर त्या माणसाला दाखवतों माझा इंगा !

**आनंदराव**:—जाऊं द्याहो काका ! अशानें तें प्रकरण मिटेलसें वाटतें ?

**शामराव**:—अगदींच व्यवहार सोडून कसें बोलतां हो आनंदराव तुम्हीं ? त्या सौभाग्यवती यमू काशीकरला तिच्या त्या नवऱ्यानें बेदम मारल्यापासून ती जाते कां कुठें घराबाहेर ? असा चौफेर लंबे करावा त्या नारू नारळकराला कीं त्याला जन्माची आठवण राहील...तुम्हीं सांगत असाल तर...नाहींतर आमचें हो काय जातें.

**आनंदराव**:—त्यांचा का तो कारभार ? मला वाटलेंच होतें...मोठा कुटाळ आहे तो...ज्याच्या अंगाशीं जाईल त्याला कुयरीसारखा सतावून त्रस्त करीत असतो बेटा. असेंच एकदां माझ्या आशेवर घाणेरडें पद लिहून तो गांवभर म्हणत सुटला होता......

**शामराव**:—नसत्या उचापती करणारे किती लोक असतात त्याची तुम्हाला एक गंमत सांगतों आनंदराव...त्याविषयीं तुम्ही लिहाच कुठें तरी तुमच्या बुकामधून ! महाढोंगी नि भयंकर माणूस आहे तो...बाकी तो तुमच्या पक्षांतला आहे......तुम्ही ओळखलं असाल त्याला......

**आनंदराव**:—कोण बरं ? नाहीं आठवत !

**शामराव**:—जाऊं द्या नांव कशाला घ्या उगाच त्याचे ? तो आहे डॉक्टर...पण मोठा बिलंदर...! धड चार वाक्यें त्याला शुद्ध नि व्यवस्थित लिहितां येत नाहींत पण त्यानें एका मुलींच्या मेळ्यांत एक म्हणे संवाद करून दिला आणि तो त्या मुलींनीं त्यांचा मेळा जेथें जेथें जाईल तेथें म्हणून दाखवावा म्हणून त्या मेळ्याच्या मागें मागें हिंडत असे.

**आनंदराव**:—कधींची गोष्ट ही ? मी कधीं मेळे ऐकायला जात नाहीं.

**शामराव**:—का उगीच वेड घेऊन पेडगांवला जातां आनंदराव ? त्या संवादांत त्यानें गांवांतील एका गृहस्थाच्या मुलीविषयीं कांहींसें अनुदार लिहिलें होतें...नि अशामुळें समाजांत अनीति वाढते म्हणून त्यानें सारांश काढला होता...पण तो स्वत: कसा आहे हें सर्व गांव जाणत आहे...खाई त्याला खवखवे !

**आनंदराव**:—जाऊं द्या हो...काय करायचं त्याच्याशीं आपल्याला ?

**शामराव**:—अहो गंमत आहे पुढें ती निराळीच...म्हणे त्यानें जो आपला–आपण लिहिलेला संवाद म्हणून जगभर जाहीर करीत सुटला होता तो त्यानें दुसऱ्याच एका लेखकाकडून लिहून घेतला होता नि आपल्याच नांवावर तो मिरवीत मिशीला तूप लावून फिरत होता...काय म्हणाल या अशा चांडाळ माणसाला ? अहो सुशिक्षितांत या उचापती–तर त्या नारू नारळकरला कां दोष द्या ?...पण काय हो...तो नारू तुमच्याविरुद्ध कां ?

**आनंदराव**:—मागें मिठाचा सत्याग्रह झाला ना ? त्यानंतर त्याचें माझें जमलें नाहीं.

**शामराव**:—असे वाहियात लोक सरळ येणार नाहीत चौदावें रत्न दाखविल्यावाचून !

**आनंदराव**:—कोणी लागावें अशा लोकांच्या नादाला ? तुम्ही म्हणतां त्या मुलीच्या बापानें मेळ्यांतील संवादाबाबत उपेक्षा दाखविली यातच त्यांचा शहाणपणा दिसून येत नाहीं का !

राम राम ! आणखी किती सटरफटर विषय शामरावांनीं काढले याची मोजदाद करणें शक्य नव्हतें. ते केव्हां निघून जातील असें आनंदरावांना होऊन गेलें होतें. पण त्यांना "आतां चला" असें मुंबई वगैरे मोठ्या शहरांतून सुचवितात तसें कसें सुचवितां येईल याची आनंदरावांना पंचाईत पडली होती.

शेवटीं शामरावांनीं मुख्य विषयाला हात घातलाच. विश्वनाथ काळे नांवाच्या एका दुकानदाराला आपल्या तांदुळाच्या गिरणीच्या आवारांत नेऊन नाथूरामशेठनें विश्वनाथने त्यांचे पैसे वेळेवर दिले नाहींत म्हणून आपल्या गड्यांकडून चांगला चोप देवविला.

नाथूरामशेटनें मारल्यावरून विश्वनाथनें त्यांच्यावर फिर्याद दिली होती. ती गेला आठवडाभर भय्यासाहेबांपुढें चालू होती. विश्वनाथला मार दिला तो दिला...उलट तो आपल्या गिरणींत आला होता नि सर्वांचें लक्ष चुकवून तांदुळाची एक गोण चोरून हमालाकडून तो लांबवीत असल्याचा पुरावा नाथूरामशेठनें सादर केला. नि स्वतः शेठ म्हणे भय्यासाहेबांना जातीनें "भेटून" आले होते. अशा स्थितींत खरी ती हकीकत आनंदरावांनीं भय्यासाहेबांचे कानांवर घालून नाथूरामशेठजींना थोडी तरी शिक्षा देण्यासाठीं त्यांना "समजवावें" अशी शामरावांनीं त्यांना विनंति केली.

**शामराम:**—गरिबांचा वाली नाही हो जगांत !

**आनंदराव:**—ते खरें ! काळ्यांना शेठजींनीं मारलें हेंहि मला ठाऊक आहे...पण माझा इलाज नाहीं. माझा नि भय्यासाहेबांचा मुळींच स्नेह नाहीं. तसा असता तर कोणावर अन्याय होऊं नये म्हणून चार शब्द बोललोंहि असतों–पण—

आनंदरावांचें हें उत्तर शामरावांना जरा सुद्धां खरें वाटलें नाहीं. ते कांहीं तरी थापा देऊन वेळ मारून नेत आहेत असें शामरावांना वाटलें. त्यामुळें त्या दोघांची त्या बाबत बरींच उत्तरें प्रत्युत्तरें झालीं.

**शामराव:**—आनंदराव, इतके गांधी होऊन चालत नसतें जगांत ! हें कलियुग आहे !! जशास तसें वागलें तरच माणसाचा निभाव लागतो.

**आनंदराव**:—माझा अनुभव तसा नाहीं काका ! काय करायचं ?

शामरावांनीं आनंदरावांपुढें हात टेकले...नि नाइलाज झाला म्हणून ते निघून गेले...आनंदरावांनीं एक सुटकेचा श्वास सोडला.

**आशा**:—गेली कां बला ? काळ्यांकडे त्यांची सोयरिक जमायचीय्.

**आनंदराव**:—खरें कां ? तुला कसें कळलें हें ?

तो शनिवार होता. भय्यासाहेबांचा पट्टेवाला सुशिलाबाईचा निरोप घेऊन आला होता. सुभाताई पुण्याहून आल्या असून त्या त्यांच्याकडे बसल्या आहेत म्हणून त्यांनी आशेला बोलावून घेतलें.

**आशा**:—केव्हां आलां तुम्हीं ताई ? शांताचा वसंत कसा आहे ?

**सुभाताई**:—बराच आजारी होता तो ! मुलांची कशी काळजी घ्यायची हें अलिकडच्या मुलींना कां कुठें समजतंय् ?

**सुशिलाबाई**:—साऱ्याच मुली बी. पी. एन्. ए. होऊं शकत नाहींत.

**सुभाताई**:—पण आंगच्या गोष्टी कांहीच कां नसाव्यात ? गैर वेळेला मुलगा रडतो म्हणून त्याला दूध का पाजायचें ? आतां हें कां शांतीला सांगायला हवें होतें.

**आशा**:—आतां ठीक आहेना बाळ ?

**सुभाताई**:—ठीक आहे. अशा किती धांवाधांवी करूं मी आंबेगांवाहून पुण्यापर्यंत...आपलें हें रेल्वे स्टेशन आहे म्हणून सरळ पुण्याला जातां येतें म्हणून ठीक नाहीं तर माझे हाल कुत्रा खाताना.

**सुशिलाबाई**:—शांताची तरी प्रकृति ठीक आहे ?

**सुभाताई**:—जळ्ळें मेलें ! वर्ष झालें नाहीं तों मला वाटतें...पुन्हा तिची काळजी उत्पन्न झालीय् !

**आशा**:—म्हणून म्हणतें शांतीला गुरूविद्या दिली असती थोडीशी तर, तिचे जाऊंद्या—तुम्हाला चार दोन वर्षेपर्यंत निष्काळजी नसतें कां राहतां आलें ?

**सुभाताई**:—आनंदरावांनीं बरीच पटाईत केलेली दिसतेय् तुला !

**सुशिलाबाई**:—पण काय म्हणतात तें यशस्वी होतं कां हो ताई ?

**आशा**ः—अगदीं शंभर टक्के होतं.

**सुभाताई**—पण म्हणे मज्जातंतूंवर वाईट परिणाम होतात त्याचे, नि त्यामुळें बायकांची प्रकृति ढांसळते–नि तें अनैसर्गिक आहे मुळीं.

**आशा**—तुम्हीं कांहीं तरी अशास्त्रीय बोलतां !

**सुभाताई**—डॉक्टर्स बोलतात तें खोटेंच वाटतें ?

**आशा**—ते तसें न बोलून करतील काय ? मुलें निरोगी निपजली. त्यांच्या आया सुदृढ राहिल्या म्हणजे डॉक्टर्सचा धंदा चालणार कसा ? शुद्ध शास्त्र बोलत नाहीं...त्याचें अर्थशास्त्र त्यांना तसें बोलायला लावतें—

**सुशिलाबाई**ः—लागोपाठ मुलें होणें म्हणजे नको जन्म होतो बापड्या स्त्रियांना —जपा बाई तुमच्या शांतीला.

**सुभाताई**ः—तिची काळजी तर वाटतेच...पण खरं सांगायचं म्हणजे मी नोकरीला कंटाळलेंय् अगदीं. राजिनामा देऊन मोकळें व्हावें असें मी ठरवलेंय्.

**सुशिलाबाई**ः—वा ! इतकी छान पगाराची नोकरी बायकांना मिळत असते कां कुठे ? वाटेवर पडल्यात वाटतें असल्या नोकऱ्या ? मला मिळती तर मी सोडली नसती कधींच.

**सुभाताई**ः—भय्यासाहेबांची कायमची नोकरी इमानेइतबारें करतां, त्यानें नाहीं झालें तुमचें समाधान ?

**आशा**ः—पण तुमचें कांहीं थकण्याभागण्याचें वय नाहीं हें.

**सुभाताई**ः—तूं का पंचवीस वर्षांची पोर समजतेस मला ?

**सुशिलाबाई**ः—तशा कांहीं तुम्ही वयाच्या दिसत नाहीं, ताई !

**सुभाताई**ः—सांगतेस तर भय्यासाहेबांना माझ्याशीं लग्न करायला ?

**आशा**ः—तुमचें आपलें ताळ ना तंत्र ! चला !

**सुभाताई**ः—जाऊंद्या ते. काढा बाई तुमचे ते फराळाचे डबे कोठें आहेत ते—भूक लागलीय् मला.

**सुशिलाबाई**ः—उपाशी होतां वाटतें पुण्याला ?

**सुभाताई**ः—माझा संसार का होता तिथें ?

**आशाः**—करा कीं ! नि इथें तरी कुठें धड आहे ?

**सुभाताईः**—शोधून तरी द्या एकादें स्थळ !

**आशाः**—ज्याचें त्यानेंच शोधावें हेंच चांगलें. दिवस हे असे !

**सुभाताईः**—खरं सांगूं आशू तुला...माझं आनंदरावांवर प्रेम आहे. हें बोलतांना ताई कितीतरी मोठ्यानें हंसल्या.

**सुशिलाबाईः**—जप बाई आनंदरावांना, आशा ! चूकभूल होते माणसाच्या हातून. नाही तरी ताई एकादे वेळेस भारीच तारीफ करीत असतात तुझ्या आनंदरावांची.

**सुभाताईः**—म्हणून कां जपतां आहां तुम्ही भय्यासाहेबांना ?

**आशाः**—त्या कुठे जपताहेत त्यांना ? उलट तेच जपतात यांना. तुमच्या माझ्या बरोबर सुद्धां एकटीला पाठवीत नाहींत ते.

**सुशिलाबाईः**—कधी नाहीं पाठविलें त्यांनीं मला ?

**सुभाताईः**—येतां तेव्हां पुढें मागें पट्टेवाले मिरवीत येतां !

**आशाः**—पण त्याला त्या काय करतील ?

**सुभाताईः**—बरं आठवलं—पुण्याहून येतांना मी मठारच्या शेंगा आणल्या आहेत. येतां तुम्ही दोघीजणीं आज रात्रीं माझ्याकडे. वाटाणे पॅटीस करून वाढीन तुम्हांला.

**आशाः**—माझी तयारी आहे.

**सुशिलाबाईः**—मीहि येईन. अगदीं नक्की.

त्या हें वाक्य बोलल्या खऱ्या. पण त्यामागें तितकासा जोर नव्हता.

**भय्यासाहेबः**—कुठें जाणार आहां तुम्ही ?

भय्यासाहेबांनीं जिन्यांतूनच आपल्या पत्नीला विचारलें. सुशिलाबाई चपापल्या...त्या एकदम चूप बसल्या.

**सुभाताईः**—म्हटलं अजून कसें उतरलां नाहीं तुम्ही खालीं ?
बरे वेळेवर आलांत ! आतां तरी लौकर चहा मिळेल आम्हांला.

**भय्यासाहेबः**—पण यांना कोठें बरोबर नेणार आहां वाटतें ?

**सुभाताई**:—तें होय ? मी रात्रीं ओल्यावाटाण्यांचे पॅटीस करणार आहे. तुम्हीं सुशिलाबाईंना आज पाठवाल माझ्याकडे—

**भय्यासाहेब**:—आम्हांला नाहीं कां मिळणार पॅटीस ?

**सुभाताई**:—तुम्हीं कसे याल रात्रीं ?

**भय्यासाहेब**:—येईन कीं—मला कसली हरकत आहे ?

**सुभाताई**:—तर मग या......

**आशा**:—मग ताई, आम्हांला काय उरणार ?

**सुभाताई**:—ठरलें तर भय्यासाहेब ?

**भय्यासाहेब**:—ठरलें म्हणजे, ठरलें.

थोड्यावेळानें सुभाताई आशेकडे आली. आनंदरावांनीं आशेला बरोबरच घेऊन जायला परवानगी दिली.

**आनंदराव**:—पण सुशिलाबाई येतीलशा वाटतें तुम्हांला ?

**सुभाताई**:—महाराज ! सूतिकागृह म्हणजे आनंदराव वैद्यांचें घर नाहीं म्हटलं ! बाळंत व्हायला तरी एकट्या सुशिलाबाईंना सूतिकागृहांत केव्हां-तरी जावें लागणार हें न समजण्याइतके अडाणी नाहींत भय्यासाहेब.

**आनंदराव**:—राहिलं आमचें. तुम्हां मैत्रीणींना रात्र सुखाची जावो.

**सुभाताई**:—आतां कसें बोललांत ? पण तुमच्याकडे माझं एक काम आहे आनंदराव. त्यासाठीं मी आज मुद्दामच आलेंय् ! माझ्या पंधरा दिव-सांच्या गैरहजेरींत सौ. शहाणे नांवाची एक बाई बाळंतपणासाठीं आली होती ! ती घरची अत्यंत गरीब आहे. माझ्या ऐवजीं असिस्टंट नर्स तेथें त्यावेळीं हजर असायला हवी होती. पण ती बाई संस्थेचे उपाध्यक्ष मे. मोरे यांच्याकडे त्या रात्रीं सत्य—नारायणासाठीं गेली होती. तिची शोधाशोध करून तिला निरोप पोंचून ती तेथें हजर राह्यला दोन तास निघून गेले. त्या अवधींत शहाणे बाई बाळंत होऊन बाहेरच पडून राहिली होती. नंतर तिची व्हायची ती सर्व व्यवस्था झाली. ती सुतिकागृहांत असतांनाच तिचें तें मूल दगावलें. त्यामुळें ती सारखी रडत होती म्हणे. ती म्हणते माझी आबाळ झाली—माझी दाद लावा त्याबद्दल. नाहींतर गांवभर बभ्रा करीन मी येथील गैर व्यवस्थेचा—मग

बाळंतपणास एक बाई आली तर मला विचारा ? अशींच का असतात तुमचीं इस्पीतळें ? आतां तुम्हीं जाणतांच आनंदराव–कीं माझ्या हाताखालच्या त्या नर्सवर मोऱ्यांची मेहरनजर आहे. तिच्याविरुद्ध बोर्डाकडे मी कांहीं तक्रार केली तर बोर्डांतील सभासद तिचींच बाजू घेऊन बोलतात. नि इकडे ती शहाणेबाई सारखी धमक्या देतेय्–सारखी बडबडतेय् जणूं वात झाल्यासारखी. त्यामुळें तेथें बाळंतपणासाठीं आलेल्या इतर स्त्रियांचीं मनें बिथरलीं आहेत. शिवाय त्या बाईचा नातेवाईक तो शामराव का कुणी आहेत ना ? तो येऊन गेला तेथें एकदां म्हणे ? काय करावं हेंच मला सुचेनासें झालेंय्—

**आशाः**—घाबरलां कीं काय ताई ?

आनंदरावांनीं थोडा वेळ विचार केला.

**आनंदरावः**—तुम्हांला आपण होऊन त्या असिस्टंट नर्सविषयीं कांहीं करायचें असेल तर–तुम्हीं त्या शहाणे बाईचा जबाब लिहून घेऊन त्यांची त्यावर सही अगर आंगठा घेऊन तो चिटणीसांच्या रोजच्या कामकाजाच्या फाईलींत लावून ठेवा. तो जबाब त्यांच्या वाचनांत आला म्हणजे ते आपणहून तुम्हांला विचारतील. त्यावेळीं सर्व कांहीं स्पष्ट करतांना त्या शहाणे बाईचा असा लेखी जबाब घेऊन तो दप्तरीं दाखल करून घेण्याशिवाय त्यावेळीं दुसरें कांहीं करतां येणें शक्य नव्हतें असे त्यांना सांगा. म्हणजे वाटल्यास पुढें त्या गोष्टीची कांहीं वाट लावायची असल्यास ते लावतील. तुमचा संबंध तुटणार नाहीं त्यानंतर !

सुभाताईना ही सूचना एकदम पसंत पडली...

त्या आशेला बरोबर येण्याविषयीं आग्रह करूं लागल्या.

**आशा**—पण यांच्या जेवणाची कांहीं तजवीज करूं द्याल कीं नाहीं ?

**सुभाताई**—करतील पिठलें–भात एक दिवस हातानें, कुठें बिघडलें ? नि माझ्या वासूबरोबर चार पॅटीस पाठवून देणार आहें यांना, चार म्हटलं !

**आनंदराव**—आज दिवाळी करणार तर तिघी मैत्रिणी जमून !

**सुभाताई**—नि तुम्ही करा शिमगा.

ताई किती मोठ्यानें हंसल्या आनंदरावांना पण आपलें हसूं आवरलें नाहीं. आशा मात्र मुळींच हसली नाहीं. तिनें त्या वाक्याचा अर्थ ओळखला नव्हता असें नाहीं.

**आशा**—इतके कांहीं इकडे हे असायचे नाहींत कीं मी नसलें एक दिवस तर ते शिमगा करूं लागतील...!

**आनंदराव**—वाहवा ! आशू यांत कांहीं ताई विशेष बोलल्या बरें... इतका अर्थ ताणला प्रत्येक वाक्याचा तर अनर्थच माजेल. कोणाला कांहींच बोलायला नको.

**आशा**—नाहींतरी ताई कांहीं तरीच बोलून जातात एकदम नि आमचा जीव होऊन जातो कासावीस—त्याना काय त्याचें ?

सुभाताई गंभीर झाल्या नि निमूट बसून राहिल्या.

**आनंदराव**—शिवाय ताईंचा स्वभाव आहे जरा मोकळा अगदीं एकाद्या पुरुषासारखा...नि त्या असं कांही तरी बोलल्याच तर तें सहाजिक आहे असें धरून चालायला पाहिजे आपण ! त्या एकट्या आहेत हें विसरूं नकोस आशू.

**सुभाताई**—म्हणजे—म्हणजे मी एकटी आहे म्हणून बोलतें वाटतें ? वा—! डोकें ठिकाणावर आहे कां तुमचे ?

**आनंदराव**—ताई ! म्हटलें तरी एकलेपणा हा नकळत मनाची भयाण पोकळी वाढवत असतो. मनाला घेरत असतो...तुमचा त्यांत हा असा धंदा ! बाळंतिणी—त्यांची मुलें. बाहेरचे सुखी जग पाहून तुमच्या मनावर थोडा तरी परिणाम हा होणारच !

**सुभाताई**—बरं—मग ? त्याचे काय ?

**आनंदराव**—क्षमा करा. मी स्पष्ट बोलतों ताई जरा...तुमच्या या बेछुट मोकळेपणाच्या मागें कांहीं तरी अशी एक असंतुष्ट वृत्ति, अपुरेपणाची जाणीव आहे कीं ती तुम्हाला हे सारें बोलायला लावतें...नि त्यांत तुमच्या सुखेच्छेची अंशतः भरपाई होऊन जाते. थोडीशी का होईना...तुम्ही आपल्या अंतर्मनाला अशी साद देत आहां...

**सुभाताई:**—चुलींत घाला तें तुमचें तर्कट...कांहींतरींच तुमचें !

**आनंदराव:**—तर्कट नाहीं ! मानसशास्त्र आहे तें. प्रत्येक असंतुष्ट जीवाचें—केवळ माणसाचेंच नाहीं—असेंच कांहीं तरी होत असतें. तें त्याचें त्यालाच कळत नसतें तें काय होतें तें.

**सुभाताई:**—बरं ? असू द्या आमच्या असंतुष्ट इच्छा...पण त्याला उपाय नाहीं सांगितला तुम्हीं, पंडीत !

**आशा:**—सांगा. आतां कां गप्प बसायचं झालं ?

**आनंदराव:** . तें कसं सांगू मी हा प्रश्न पडलाय् मला ! पण सांगतोंच. ताईनीं आपलं लग्न करून घ्यावं ...म्हणजे...

आनंदरावसारख्या लेखकाचा हा अढावा होता. सुभाताईनीं दुसऱ्या एकाद्या वेळीं 'होय, करतें मी तुमच्याशींच ! होतां कबूल ? असें उत्तर देऊन आशेला लाजवून टाकलें असतें. नि आनंदरावांना नर्व्हस केलें असतें...पण आज आनंदरावांच्या निदानानें त्या निरुत्तर झाल्या. नि धरणीकंप झाल्या-प्रमाणें त्या भेदरून गेल्या—

**सुभाताई:**—तोच माझा विचार चालू आहे....

त्यांची ही सरळ–नि अचानक कबुली ऐकून तीं पतिपत्नी चाट पडलीं...

---



आज सकाळपासून सुभाताई विशेष आनंदांत होत्या...त्यांच्या हाताखालची नर्स त्यांच्याशी आदबीनें–आणि आनंदानें वागून त्या सांगतील तें काम ती पार पाडूं लागली...त्यांच्या जांवयांचें पत्र आलं होतं. नि

शांताची नि त्यांच्या छोट्या वसंताची प्रकृति उत्तम असल्याचा मजकूर त्यांत होता...त्यांत भर म्हणून कीं काय श्री. विनायकराव जोगांचें तुरुंगांतूनहि एक खुशालीचें पत्र आलें होतें. ते छोटेसें होते तरी त्यांचे माफीचे दिवस कापून त्यांच्या सुटकेचा नक्की दिवस त्यांनीं कळविला होता. त्यावरून ते पुढच्या महिन्याच्या अखेरीस सुटणार हें ताईंच्या मनांत येऊन त्यांचे हृदय सारखें हेलावत होतें...चंद्रप्रकाशांत अगोदर माधुरी असते. नि समोर पाणी तरंगत असलें म्हणजे विशेष रम्यता उत्पन्न होते. नि त्यांतून ही शीतल अशा सुखकर वाऱ्याच्या झुळुका आंगाला स्पर्श करीत असाव्यात. अशा क्वचित् वेळीं सहृदय भावप्रवण माणसाला जे स्वर्गसुख वाटत असेल तसेंच कांहीं तरी त्यांना वाटत होतें......

अर्थांत आज घरीं हातानें सैंपाक करावा कीं आशेकडे अचानकपणें आयतें जेवायला जावें याचा विचार त्या करीत होत्या. तोंच त्यांच्या वासूनें त्यांच्या हातांत एक चिटोरें आणून दिलें.

**वासू**—चिटणीस साहेबांच्या कारकूनानें वाटेंत मला दिलें हें.

सूतिकागृहाच्या चिटणीसांनीं आपणाला कां बोलावलें आहे ते आनंदांत वावरणाऱ्या फुलपांखराच्या एकतानतेंत असलेल्या सुभाताईंना चटकन् आकलन झालें नाहीं. त्यांनीं जरा विचार केला. ज्या अर्थी मला लेखी "हुकूम" आलाय् त्या अर्थीं कांहीं तरी विशेष कारण असणार हे त्यांनीं हेरलें. त्यांनीं दुसऱ्याच क्षणीं आपले फाऊंटन घेतलें. नि त्याच आवेशांत त्यांनीं आपल्या नोकरीचा राजिनामा खरडला. नि तो त्यांनीं आपल्या पोलक्याच्या खिशांत ठेऊन दिला.

त्या तशा भलत्या वेळेला गांवांत आल्या...चिटणीस समोर दिसतांच त्यांनीं सहज म्हणून एक नमस्कार केला. तो त्या सद्गृहस्थांनीं परत केला नाहीं. त्याच वेळेस सुभाताईंचे त्यांच्या त्या चिडक्या चेहऱ्याकडे लक्ष गेलें. हा सर्व अवतार पाहून चतुर ताईंनी अर्धे अधिक संकट ओळखलें. शहाणे बाईंच्या त्या जबाबाची हकिकत परभारें त्यांना कुठून तरी कळली असावी. नि त्यावर ॲसिस्टंट नर्सचें त्यांच्याकडे कांहीं तरी कुभांड रचणारें असें विपरीत स्पष्टी-करण आलें असावें. अर्थात त्याबाबत त्यांचाच खोडसाळपणा सिद्ध करण्याची चिटणीसांना उत्सुकता लागून राहिली असावी...

**सुभाताई**:—माझा हा राजिनामा मी देतें...पुढच्या महिन्यापासून मला नोकरीवर राहतां यायचें नाहीं.

त्या वकील साहेबांना कांहीं एक बोलूं न देतां आपला अर्ज त्यांनीं त्यांच्या हातीं दिला.

एक दोन क्षण तसेच त्या स्तिमितावस्थेंत गेले. ते सुभाताईकडे पहातच राहिले. बिचाऱ्या सुभाताईंनीं आपली नजर वळवून दुसरीकडे पाहिलें...

**चिटणीस**:—हा राजिनामा स्वीकारतां यायचा नाहीं. काय समजलें ?

**सुभाताई**:—आपण तो बोर्डापुढें ठेवावा. बोर्ड ठरवील काय तें.

**चिटणीस**:—अस्सें ! तुम्हाला वाटत असेल कीं बोर्डाचे अध्यक्ष तुमचे परिचित आहेत म्हणून तुमचा राजिनामा तात्काल मंजूर होईल म्हणून'! अँ ? ती कल्पना सोडून द्या ! काय समजलें ?

**सुभाताई**:—एकटेच भय्यासाहेब म्हणजे कांहीं बोर्ड नाहीं. हें मला समजतें.

**चिटणीस**:—पुष्कळ ऐकलीं आहेत. अशी कायदेबाज उत्तरें तुमचीं मी ! राजिनाम्याचें पाहतां येईल काय तें...अगोदर हें सांगा. सौ. शहाणे सूतिकागृहाबाहेर बाळंत झाल्यामुळें त्यांचे फार हाल झाले. त्यामुळे त्यांचे ते अर्भक दगावलें. ही हककीत या वर्तमान पत्रांत कुणी दिली ?

एक वृत्तपत्र त्यांच्यापुढें सारीत श्री. चिटणीस गंभीर झाले.

**सुभाताई**:—मला माहीत नाहीं. मी ही दिली नाहीं.

**चिटणीस**:—अस्सें ? मग त्या बाईचा लेखी जबाब घ्यायचें कारण ?

**सुभाताई**:—ती बाई माझी दाद लावा म्हणून सारखी ओरडत होती.

**चिटणीस**:—मग तो मला कां दाखविला नाहीं ?

**सुभाताई**:—सूतिकागृहाच्या कचेरींत आपल्या निकडीच्या कागद-पत्रांत ठेवला आहे तो.

**चिटणीस**:—मला तिकडे यायला जमत नाहीं हें तुम्हांला माहीत असतांना तो जबाब वासूबरोबर माझ्याकडे कां पाठविला नाहीं ? काय समजलें ?

**सुभाताई**:—आपण सूतिकागृहांत लौकर खेप घालाल असें वाटलें होतें मला.

**चिटणीस**:—उलट माझ्यावर त्याचें खापर फोडूं पाहतां काय ? मी वकील आहें. काय समजलें ?

**सुभाताई**:—मी पण नर्स आहे, काय समजलें ?

**चिटणीस**:—माहित आहे मला...हा पहा त्या शहाणेबाईंचा नवीन जबाब. ह्यांत त्यांनीं, तुम्हीं नि सौ. वैद्य यांनीं घेतलेला जबाब बळजबरीनें लिहून घेतला आहे असें साफ साफ म्हटलें आहे. त्यावेळीं आपल्या गांवांतील श्रेष्ठ वकील श्री. चौबळ हे हजर होते. त्यांची सही आहे यावर–काय समजलें ?

**सुभाताई**:—मी फाईलींत दाखल केलेल्या जबाबावर शहाणेबाईनीं स्वखुषीनें आंगठा दिला आहे.

**चिटणीस**:—मग काय आम्हीं खोटे ?

**सुभाताई**:—मग मी खोटी वाटतें ?

**चिटणीस**:—सरळ बोलाल कां ?

**सुभाताई**:—सरळच उत्तर देतेंय् मी. आपल्या संस्थेला उपद्रव न पोंचतां, नि माझ्या हाताखालच्या नर्सवर मी मुद्दाम कांहीं बालंट घेते असें कुणाला वाटूं नये म्हणून कमींत कमी जें कांहीं करतां येईल ते मी सद्बुद्धिनें केलें आहे. आतां ती बातमी वर्तमान पत्रांत आलीय्. पण ती मीच दिली हें कशावरून ? दुखावलेल्या त्या शहाणेबाईंच्या कोणातरी परिचितानें ती दिली असल्याचा संभव आहे.

**चिटणीस**:—अस्सें काय ? ऑसिस्टंट नर्सविषयीं जसा कांहीं तुमचा हेवा दावा नाहीं !

**सुभाताई**:—माझा तिच्याशीं हेवदावा असण्यासारखें काय आहे तिच्या-पाशी...पण संस्थेच्या बोर्डातील एका सभासदाच्या नात्याची ती बाई ! धड नर्सिंगचे शिक्षण नाहीं–थर्मामीटर झाडतां येत नाहीं–कीं कुणाला बेडपॅन कसें द्यायचे हे माहित नसतांना ती जर बी. पी. एन्. ए. झाल्याचा भलताच

शिष्टपणा दाखवील तर, तर त्या व्यवसायांतील योग्य तें ज्ञान असणाऱ्या व्यक्तींशी वागतांना जें कांहीं होणें शक्य असतें तें होणें अपरिहार्य आहे, हें मी नाकबूल करीत नाहीं. नि ती नालायक बाई आपल्या सूतिकागृहांत कायमची राहणार असून उलट मलाच जावें लागणार आहे हेंहि मी नाकबूल करीत नाहीं. म्हणून मी चाललें आहे.

सुभाताईचा सडेतोड स्वभाव थोडाफार चिटणीसांना अगोदरपासून माहीत होता. पण ही बाई इतकी तापट असेल अशी त्यांची कल्पना नव्हती. सूतिकागृहाच्या बोर्डानें एकमतानें नोकरीस ठेवलेल्या ॲसिस्टंट नर्सला 'नालायक' म्हणून संबोधून सबंध बोर्डाचा उघड अपमान करण्याइतकी धृष्ठ आणि स्पष्टवक्ती अशी ही बाई असेल हें स्वप्नांतसुद्धां त्यांनीं मानलें नसतें. त्यामुळें ते बरेचसे चिडले होते.

**चिटणीसः**—कांहींएक ऐकायचें नाहीं मला तुमचें! बोर्डापुढें काय सांगायचें असेल तें सांगा.

ते रागारागानें खुर्चीवरून उठले.

**सुभाताईः**—मी आपणहून नाहीं आलें. आपण मला बोलाविली. असें वेळीं अवेळीं दुपारीं भर बारा वाजतां हेड नर्सला सूतिकागृहांतून बोलावून तिला आपली ड्यूटी सोडायला लावायचा अधिकार चिटणीसांना आहे कीं नाहीं याचाहि मी बोर्डाकडून खुलासा विचारीन. हें तुमचें पत्र आहे मजपाशीं पाहूं या बोर्ड काय म्हणेल तें!! काय समजलें?

सुभाताई रागाच्या झटक्यानेंच तेथून बाहेर पडल्या, त्या थेट आनंदरावांकडे आल्या. वामकुक्षी करीत असलेल्या आनंरावांना त्यांनीं उठवलें...नि ते जागे होऊन 'काय हो' असे विचारतात न विचारतात तों सुभाताई कधीं नाहीं त्या कोसळून रडायलाच लागल्या. त्यांना आपली भावनाकुलता आवरतां आली नाहीं. वावटळ आली तर जमीन हादरत नाहीं—फारतर धूळपाचोळा उडतो... पण समुद्राला मात्र जोराच्या लाटा येतात...तशांतलाच प्रकार होता हा!

आनंदरावांनीं त्यांना शांत करून थोडेसें जेवायला घातलें. पोटांत अन्न गेल्यामुळें सुभाताईना तरतरी आली. आपण उगाच रडलों...कांहीं म्हटल्या

कांहींसुद्धां तसें कारण नव्हतें. असें त्यांनाहि वाटलें. आनंदरावांनीं त्यांची ती हकीकत ऐकून घेतली—

**आनंदराव**:—राजिनामा दिलांत तर !

**सुभाताई**:—दिला. बरी कटकट चुकली. ब्याद गेली मागची !

**आनंदराव**:—ठीक आहे. आकाश पाताळ काय एक व्हायचें तें होवो. माझ्यानें होईल तें करीन मी तुमच्यासाठीं. भीऊं नका !

सुभाताईंच्या मनांतील भावनांचा कल्लोळ शांत झाला आहे हें पाहून आशा सैंपाकघरांत निघून गेली.

**आनंदराव**:—चला ताई, आपण सैंपाकघरांतच बोलत बसूं.

आनंदरावांची ही चलाखी ताईंच्या पूर्ण परिचयाची होती...कोणाहि स्त्रीला ज्या पुरुषापाशीं बोलतां वागतांना पूर्णपणें आपण सुरक्षित आहोंत अशी मनोमय खात्री वाटणें हाच त्या पुरुषाचा लौकिक होय. तीच त्याची कीर्ति–तोच त्याचा संगोपनीय असा बहुमोल अलंकार होय, असें आनंदराव मानीत असत हें त्यांना माहीत होतें, तरीसुद्धां तेथची बैठक त्यांनीं मोडली याचें कारण दुसऱ्या कुणाला उगीच संशयाला जागा कां द्या–नि भलतेंच काहूर आपण आपणांवर ओढून कां घ्या या सावधगिरीच्या जाणिवेनें ते उठले असावेत हेंच असूं शकणार याविषयीं सुभाताईंना निश्चित खात्री होती.

**सुभाताई**:—फार जपतात बाई तुझे आनंदराव तुझ्या भावनांना. भाग्यवान् आहेस तूं आशा !

सुभाताई अगदीं गदगदल्या अंतःकरणानें उद्गारल्या.

**आशा**:—नि तुम्हांला नाहीं कां एक सन्मित्र लाभले !

आशा खुदकन हंसली.

त्यांची मघाच्याच विषयाविषयीं चर्चा चालू होती.

**आनंदराव**:—कां भितां उगीच?

**सुभाताई**:—जायचेंच तें गांवकऱ्यांनीं मला घालवून दिली असें म्हणायला जागा राहूं नये म्हणून जपायचं—दुसरं काय ? काय समजलं ?

चिटणीसांच्या 'काय समजलं, या वाक्योच्चाराची सही सही नक्कल करीत बाई हंसल्या. आनंद–आशा तर हंसण्यासाठींच जन्मले होते.

**आनंदराव**:—कांहीं सुद्धां व्हायचें नाहीं तुमचें ! तुम्हीं सांगितल्या-वरून मी शहाणेबाईच्या त्या जबाबाची प्रत त्याच दिवशीं मी—मी स्वतः जाऊन भय्यासाहेबांना दाखविली होती.

**सुभाताई**:—तुम्हीं स्वतः गेलां होता ?

**आनंदराव**:—तुमचें काम तें माझें काम ! आपलें काम असल्यावर माणसानें दुसऱ्याला आपण होऊन भेटायला जायलाच हवें.

**सुभाताई**:—ते काय म्हणाले ?

**आनंदराव**:—म्हणाले, फाईलला लावून ठेवायला सांगा तो जबाब ! बोर्डापुढें तें प्रकरण विचारासाठीं आलें म्हणजे योग्य तें मी करीन.

**सुभाताई**:—असें म्हणाले ना भय्यासाहेब ? झालें तर मग !

**आनंदराव**:—आपण त्यांना तो जबाब अगोदरच दाखविला आहे यावरून तुमचा हेतू तो जबाब घेतांना यत्किंचितहि वावगा नव्हता याची खात्री ते बोर्डाला देतील—

**आशा**:—तें सारें खरें...पण ताई तुम्हीं भेटा बाई भय्यासाहेबांना नि नीट घाला त्यांच्या कानावर सारें कांहीं.

**आनंदराव**:—त्यांत काय आहे ? खरें तें बोलायला भय्यासाहेब मागें कां घेतात ?

**आशा**:—मला शंका वाटते—येतों—नक्की येतों म्हणून भय्यासाहेबांनीं आम्हांला बजावूनही निदान सुशिलाबाईंना तरी ताईकडे पाठविल्या नाहींत पॅटीस खायला—त्यांनीं सरळ नाहीं म्हणून सांगितलें असतें तर त्यांचे का कोण घोडें मारणार होतें ? आम्हांला उगाच सुशिलाबाईंची वाट पहात ताटकळत बसावें लागलें बराच वेळ त्या रात्रीं.

**सुभाताई**:—आहे खरा त्यांचा स्वभाव तसा तऱ्हेवाईक जरासा. आपल्या पत्नीनें एक दिवसही आपल्याला सोडून जाऊं नये असें एकाद्या पुरुषाला वाटणें कांहीं गुन्ह्याच्या सदरांत येत नाहीं.

**आनंदराव**ः—पण एवढेंच साधें कारण नाहीं. सुशिलाबाईंची कुचंबणा होते त्यानें.

**सुभाताई**ः—आणखी एक गोष्ट चुकली माझी या भानगडींत...मी पॅटीस करायला गुंतलें होतें. शहाणेबाईंचा जबाब लिहून घ्यायला आशेला मीच सांगितलें. माझ्याच सांगण्यावरून दुसरी प्रत तिनें तयार केली. तिनेंच त्या बाईचा आंगठा उठवून घेतला. माझ्या या हलगर्जीपणामुळें तुम्हीं नि ही बिचारी आशा उगाच या प्रकरणांत पोळले जाणार आहां. तुमच्यावर नाहीं नाहीं ते आरोप करण्यांत येतील. कारण मला त्या चिटणीसांच्या स्वभावाची पुरेपूर पारख झाली आहे. आपल्या पायांपुरतें पाहणारा मत्सरी नि क्षुद्र वृत्तीचा आहे तो.

**आनंदराव**ः—सहजगत्या व्हायचें तें होऊन गेलें. जो होईल तो त्रास सहन करायला नको कां ? काय करायचें त्याला ?

**सुभाताई**ः—अगदीं सख्ख्या भावासारखें बोललां तुम्हीं आनंदराव.

**आशा**ः—फार संयम सुटला तुमचा वन्स !

**सुभाताई**ः—वन्सं ? वन्सं ? पण मी कांहीं तुला वैनी नाहीं म्हणायची कांहीं केल्या !

**आशा**ः—मी का पाठीस लागलें तुमच्या म्हणा म्हणून ?

**आनंदराव**ः—तुमचं तुम्हीं पाहून घ्या दोघींनीं. मी तर तुम्हांला केव्हांपासून ताई म्हणून हांक मारीत आलोंय् !

**सुभाताई**ः—कुणाचें इतकें लक्ष होतें तुम्हीं मला काय हांक मारतां तें ?

**आशा**ः—नि मला या अगतुग करतात...तरी म्हणे मी...

**सुभाताई**ः—तुला तशी हांक मारीत आलें मी त्याला कारण आहे. उगीच नाहीं...माझ्या शांतीसारखी पोरसवदा वाटतेस तूं मला...फक्त तूं जरा उंच नि सडपातळ आहेस म्हणून कां तुला अहो जाहो म्हणूं ? त्यांत शांतीला वसंत झालाय्–नि...तुला आपलें अजून कांहीं नाहीं...ठणठणाट नुसता !

**आशा**:—औषध असलें कसलें तर सांगा तुमच्यापाशीं–म्हणजे उजवेन तरी मी एकदांची–मला कां हौस नाहीं, होय ?

**सुभाताई**:—बाळंत–काढा घेत जा रोज चमचा चमचा !

आनंदरावांना हंसू आंवरेना–सुभाताईनीं आपलें हसूं मिष्किलपणानें आवरलें होतें. या थट्टेनें आशा फुरंगटली....

**आशा**:—नि तुम्ही बालामृत घेत जा म्हणजे आंगावर बाळसें तरी येईल थोडेंसें तुमच्या...अगदी वाळून गेलांत त्या.

**आनंदराव**:—हें काय आशू–अग चिडायला काय झालें ?

असं म्हणतात कीं ज्या शेतांत तंबाखूचें पीक येतें त्या शेतांत हुंगायला-सुद्धां गाढव हा प्राणी जात नाहीं...पण मनुष्य मात्र त्यांत पिकलेला तंबाखू आपली आंतडी तुटेपर्यंत ओढतो...विचित्र वाटतें हें सत्य !

---



तसें हें निर्विकार दृष्टीनें पाहिलें तर त्या शहाणे बाईच्या प्रकरणांत लक्ष घालण्यासारखें असें विशेष कांहीं नव्हतें...पण कुटाळ कंपूना...नि पक्षोपक्षीय हितसंबंधीयांना ती एक अलभ्य अशी संधी वाटली ती त्यांनीं आपापलें पुरेपूर हित साधून घ्यायचा निश्चयच केला होता. त्यामुळें सूतिकागृहांत त्या बाईच्या झालेल्या अनास्थेचा विचार करून तसें पुन्हां न होईल याची कांहीं काळजी घेण्यासाठीं संस्थेच्या बोर्डानें विचार करण्यापूर्वीच आख्या शहरभर तें प्रकरण विशेष भडक रंगानें रंगविलें गेलें...घरोघर तीच चर्चा चाललेली ऐकूं

येत होती आणि ही रंगपंचमी पुरी करून शिमग्याची सांगता करण्यासाठीं कुणीहि मागें सरण्याचें चिन्ह दिसेना......

श्री. शामराव हे हिंदुमहासभेचा कैवार घेऊन आनंदरावांसारख्यावर नाहीं नाहीं ते आरोप करीत हिंडत होते.

" आतां कॉंग्रेसवाले बायाबापड्यांचे कोऱ्या कागदावर आंगठे घेऊं लागले आहेत. " असें एका दुकानांत बोललें जात असतांना आनंदराव रस्त्यानें जातांना त्यांचें कानीं पडलें...काय करणार ? त्यांनीं तें ऐकलेंच नाहीं असें भासवून तें पुढें चालूं लागले.

" मला ! माहित आहे. कोकणस्थ आनंदरावांची पत्नी देशस्थ आहे. म्हणून त्यांना मूल होऊं नये असें वाटतें...नि त्यांची पत्नी त्या दिवशीं सूतिकागृहांत गेली ती...ती तिला आनंदरावांनीं भलतेंच औषध दिलें तें त्यांच्या आंगाशीं आलें म्हणून पाठविली होती नर्सबरोबर..."

आशा म्हणजे मुलासाठीं कोण हपापलेली होती हें आनंदराव नि सुभाताई जाणून होत्या. लोकांनीं हें भलतेंच किटाळ उठविलें याबद्दल त्यांच्या कल्पना शक्तीची तारीफ करायला त्यांची हरकत नव्हती...पण आनंदरावांना जेव्हां कळलें कीं एका वकीलानें आपलें सुपीक डोकें चालवून हा अचाट शोध लावण्याचें महत्कृत्य केलें होतें, त्यावेळीं त्यांना वाईट वाटलें...दुसऱ्यावर अशा तऱ्हेचा उग्रतर हेतूचा आरोप केल्याचें दुसरें उदाहरण शोधूनहि सांपडणार नाहीं...खरोखरच ! अशा मानवांना काय म्हणावें हेंच त्यांना समजेना !... वैताग वाटला क्षणभर त्यांना !

नि हीच मानवता प्रगति पथावरून पुढें चालली आहे असें सुबुद्धीनें समजायचें ? कट्टर आहे !!

या प्रकराणाचा निकाल लावतांना मुख्य प्रश्न उत्पन्न झाला होता तो मूलग्राही, नि फार महत्त्वाचा होता. सुभाताईना शहाणे बाईनीं तो जबाब आपणहून दिला कीं त्यांनीं तिच्यापासून सक्तीनें आंगठा उठवून घेतला हें सिद्ध होणें अत्यंत जरूर होतें.

**आशाः**—औषध असलें कसलें तर सांगा तुमच्यापाशीं—म्हणजे उजवेन तरी मी एकदांची—मला कां हौस नाहीं, होय ?

**सुभाताईः**—बाळंत—काढा घेत जा रोज चमचा चमचा !

आनंदरावांना हंसू आंवरेना—सुभाताईनीं आपलें हसूं मिष्किलपणानें आवरलें होतें. या थट्टेनें आशा फुरंगटली....

**आशाः**—नि तुम्ही बालामृत घेत जा म्हणजे आंगावर बाळसें तरी येईल थोडेंसें तुमच्या...अगदी वाळून गेलांत त्या.

**आनंदरावः**—हें काय आशू—अग चिडायला काय झालें ?

असं म्हणतात कीं ज्या शेतांत तंबाखूचें पीक येतें त्या शेतांत हुंगायला-सुद्धां गाढव हा प्राणी जात नाहीं...पण मनुष्य मात्र त्यांत पिकलेला तंबाखू आपली आंतडी तुटेपर्यंत ओढतो...विचित्र वाटतें हें सत्य !

---



तसें हें निर्विकार दृष्टीनें पाहिलें तर त्या शहाणे बाईच्या प्रकरणांत लक्ष घालण्यासारखें असें विशेष कांहीं नव्हतें...पण कुटाळ कंपूना...नि पक्षोपक्षीय हितसंबंधीयांना ती एक अलभ्य अशी संधी वाटली ती त्यांनीं आपापलें पुरेपूर हित साधून घ्यायचा निश्चयच केला होता. त्यामुळें सूतिकागृहांत त्या बाईच्या झालेल्या अनास्थेचा विचार करून तसें पुन्हां न होईल याची कांहीं काळजी घेण्यासाठीं संस्थेच्या बोर्डानें विचार करण्यापूर्वीच आख्या शहरभर तें प्रकरण विशेष भडक रंगानें रंगविलें गेलें...घरोघर तीच चर्चा चाललेली ऐकूं

येत होती आणि ही रंगपंचमी पुरी करून शिमग्याची सांगता करण्यासाठीं कुणीहि मागें सरण्याचें चिन्ह दिसेना......

श्री. शामराव हे हिंदुमहासभेचा कैवार घेऊन आनंदरावांसारख्यावर नाहीं नाहीं ते आरोप करीत हिंडत होते.

" आतां कॉंग्रेसवाले बायाबापड्यांचे कोऱ्या कागदावर आंगठे घेऊं लागले आहेत. " असें एका दुकानांत बोललें जात असतांना आनंदराव रस्त्यानें जातांना त्यांचें कानीं पडलें...काय करणार ? त्यांनीं तें ऐकलेंच नाहीं असें भासवून तें पुढें चालूं लागले.

" मला ! माहित आहे. कोंकणस्थ आनंदरावांची पत्नी देशस्थ आहे. म्हणून त्यांना मूल होऊं नये असें वाटतें...नि त्यांची पत्नी त्या दिवशीं सूतिकागृहांत गेली ती...ती तिला आनंदरावांनीं भलतेंच औषध दिलें तें त्यांच्या आंगाशीं आलें म्हणून पाठविली होती नर्सबरोबर..."

आशा म्हणजे मुलासाठीं कोण हपापलेली होती हें आनंदराव नि सुभाताई जाणून होत्या. लोकांनीं हें भलतेंच किटाळ उठविलें याबद्दल त्यांच्या कल्पना शक्तीची तारीफ करायला त्यांची हरकत नव्हती...पण आनंदरावांना जेव्हां कळलें कीं एका वकीलानें आपलें सुपीक डोकें चालवून हा अचाट शोध लावण्याचें महत्कृत्य केलें होतें, त्यावेळीं त्यांना वाईट वाटलें...दुसऱ्यावर अशा तऱ्हेचा उग्रतर हेतूचा आरोप केल्याचें दुसरें उदाहरण शोधूनहि सांपडणार नाहीं...खरोखरच ! अशा मानवांना काय म्हणावें हेंच त्यांना समजेना !... वैताग वाटला क्षणभर त्यांना !

नि हीच मानवता प्रगति पथावरून पुढें चालली आहे असें सुबुद्धीनें समजायचें ? कहर आहे !!

या प्रकराणाचा निकाल लावतांना मुख्य प्रश्न उत्पन्न झाला होता तो मूलग्राही, नि फार महत्त्वाचा होता. सुभाताईंना शहाणे बाईंनीं तो जबाब आपणहून दिला कीं त्यांनीं तिच्यापासून सक्तीनें आंगठा उठवून घेतला हें सिद्ध होणें अत्यंत जरूर होतें.

**आनंदराव**:—हे पहा दामुअण्णा ! तुम्हीं होता तुमच्या सौभाग्यवती सूतिकागृहाच्या बाहेर व्हरांड्यांत बाळंत झाल्या त्यावेळीं तेथें...तुम्हींच ना. मोरेसाहेबांकडून छोट्या नर्सना बोलावून आणलें ? हें सर्व कांहीं खरें होतें. तेंच त्यांनीं आपल्या पहिल्या जबाबांत सुभद्राबाईंना लिहून देऊन त्यावर आपला आंगठा खुषीनें दिला...असें असतांना चौबळ वकीलांपुढें त्यांनीं आपला जबाब कां फिरवला...कां त्या साफ साफ खोटें बोलल्या...?

शक्य तितक्या संयमित आणि आर्जवी स्वरांत आनंदराव त्यांना विचारीत होते....

त्यांची ती उंदरानें खाल्लेली टोपी त्यांच्या भालप्रदेशावर अव्यवस्थित रितीनें उभी होती...त्यांचा कोट छातीवर फाटला होता. हातांच्या बाह्यांच्या दशा बाहेर पडल्या होत्या...नेसूंचें धोतर ठिकठिकाणीं टिगाळें लावून नेसण्यां-सारखें केलें होतें तरी तें पार विटकें झालें होतें...दाढी तर दोन आठवड्यांत केली नसावी असें वाटण्याइतकी वाढली होती...आनंदराव त्यांना प्रश्न विचारीत असतांना त्यांच्या डोळ्यांत दिसून येणारी कातर चंचलता...भयभीत अंत:करण पाहून आनंदरावांना त्यांची दया आली....

**आनंदराव**:—दूध घ्या दामुअण्णा !

दामुअण्णा तें दूध दोन घोटांत घटाघट पिऊन मोकळे झाले...नि उत्तरा-दाखल म्हणून जे ते बोलायला लागले ते चिडून असंबद्ध रीतीनें बोलूं लागले. प्रथम आनंदरावांना आश्चर्यच वाटलें...

**दामुअण्णा**:—आमच्यासारख्या झोपड्यांतून राहणाऱ्या गरीब शिंप्या-कडे कोण वळून तरी बघते कां कधीं ? प्रत्येक सणावारी चमचमीत मेजवानी झोडणाऱ्या तुमच्यासारख्या सुखवस्तु लोकांना आम्हीं आमच्या मुलाबाळांची कशी पोटें भरतों याची दाद असते का ? आम्हांला आमचीं—मुलाबाळांचीं पोटें भरायचीं असतात. तें आम्हीं खरें बोलून भरूं शकूं असें तुम्हांला वाटतें तरी कसें ? तुम्हीं लेखक असूनहि गरिबांची परिस्थिति कशी असते हें तुम्हांला कळत कसें नाहीं ? आम्हांला भेटेल त्या माणसाला खूष ठेऊन वागावें लागतें. चौबळ वकील आले ते म्हणे भय्यासाहेबांच्या सांगण्यावरून माझ्याकडे आले !

एवढा मोठा वकील, रावसाहेबांचा त्यांना पाठिंबा—" मी खोटें बोलणार नाहीं " असें त्यांना बजावणें शक्य होतें का ? त्यांना हवा तसा जबाब त्यांनीं लिहिला. ' घरांतून ' त्यावर आंगठा देववला...हं आम्हां गरीबांवर झालेल्या अत्याचाराची कधींच दाद लागत नसते हें कां मला समजत नाहीं ? आम्हीं परिस्थितीनें सदैव लाचार–गुलाम असतों जगाचें ! आतां हें तुम्हीं मला दूध पाजलें आहे. पण यापूर्वी तुम्हांला माझी किंवा माझ्या मुलांची कधींच आठवण झाली नव्हती. नि व्हावी कां ? तुम्हीं कां समाजाला बांधलेले आहां ? वाटल्यास आतां तुम्हाला हवा तसा जबाब लिहून काढा...आणून देतों ' घरांतून आंगठा त्यावर ! सांगा–काय करूं मी यापेक्षां जास्त ? तुरुंगांत घालतील घाला म्हणावें, कटकट चुकेल मागची—!

दामुअण्णा शहाण्यांचे हे भावनाविव्हल आत्मकथन ऐकतांना आनंदरावांचा आत्मा व्याकुळ झाला–त्यांचा जीव तळमळत होता...त्यांचे ते असंबद्ध आणि लांबलचक बोलणें वाङ्मय दृष्टया जितकें थोडक्यांत मांडतां येईल तेवढेंच दिलें आहे. तसे ते कितीतरी वेळ बडबडत होते–नि आनंदराव ऐकत होते. त्यांचें ते बोलणें हूं का चूं न करतां ऐकून घेणारा असा पहिलाच श्रोता भेटला असावा दामुअण्णांना आपल्या हयातींत–त्यांनींहि बोलतां येईल तितकें बोलून घेतलें. कांहींहि बाकी ठेवली नाहीं त्यांनीं !

शेवटीं झाल्या प्रकारांची दामूअण्णांपाशी जास्त चर्चा न करतां आनंदरावांनी त्यांना प्रेमपूर्वक निरोप दिला—ते दीर्घ श्वास सोडीत घरांत परतले. समोर आशा दिसतांच त्यांचे कळवळलेलें हृदय त्यांना स्वस्थ बसूं देई ना.

**आनंदराव**:—काय खोटें आहे दामुअण्णा बोलले त्यांत ? कधीं आपण कुणाला उगाच चहा किंवा दूध देत नाहीं. मुलांच्या पोटांत वर्ष सहा महिन्यांत जाणाऱ्या दुधाइतकें दूध पिण्यासाठीं म्हणून एकदम त्यांचे समोर आलें असतां त्यांचे हृदय भडभडून आलें तें, तें का न यावें ?...त्यांच्या डोळ्यांत आंसवें भरून आलीं होतीं ते उगाच नाहीं. ते जें जें म्हणालें तें तें अक्षरशः खरें आहे. कधीं आपण इतका खोल विचार करतों ? गरीब लोक

आपल्या आयुष्यांत क्षणा क्षणाला मरत असत'त हें मला आज बरोबर पटलें...

**आशाः**—कुबेर असला तरी अशा गरीब लोकांना पुरा पडायचा नाहीं...म्हणून काय त्यांनी स्वार्थासाठीं खोटें बोलत सुटावें ?

**आनंदरावः**—काय खोटें बोलले ते ? त्यांना तसें वागणें भाग पडलें.

**आशाः**—पण आपलें कुठें चुकलें ?

**आनंदरावः**—गरिबांची दैन्यावस्था आपण समजूं शकलों नव्हतों हें चुकलें आपलें ! ! आपणासारखें मध्यम वर्गीय लोकांची परिस्थिति पण तितकीच खरी आहे ! ! आपण जरासें जमेल तेवढें सत्य बोलून ते टिकवूं शकतों...पण सर्वच्या सर्व सत्य आपण कधीं बोलूं शकूं का ? शकतो कां ? दामुअण्णांच्या आजच्या बोलण्यावरून, भय्यासाहेबांसारखा तालुक्याचा अधिकारी सुद्धां खरें बोलूं शकला नाहीं. खरें तें खरें आहे असें धैर्यानें म्हणूं शकत नाहीं असें नाहीं का कळलें तुला ? मग आपणासारख्यांचा काय पाड ? मनाला साक्षी ठेवून त्रयस्थ दृष्टीनें जरा विचार कर आशा...म्हणजे...!

आशा काय बोलणार ? ती तेथें थोडा वेळ निमूट बसून राहिली होती... आनंदरावांनी विमनस्क स्थितींत शेजारच्या टेबलावरचें एक पुस्तक उचललें. ते त्याचीं पानें चाळूं लागले...त्यांचें आतां वाचन सुरू होणार म्हणून आशा तेथचा दुधाचा रिकामी पेला उचलून घेऊन घरांत निघून गेली.

त्यांचें तेथील गोल टेबलाकडे लक्ष गेलें. त्या पलीकडच्या खुर्चीत आपले दोन्हीं पाय उचलून वर मुडपून घेऊन बसलेल्या दामुअण्णांची मूर्ति त्यांना स्पष्ट दिसूं लागली...ते त्या दिशेकडे बघतच राहिले...नि दुसऱ्याक्षणीं दामुअण्णा तेथें बसून बोलत असून, आपण तें ऐकत आहों असा त्यांना भास झाला. त्यांचें दिवास्वप्न सुरू झालें—त्यांच्या त्या कल्पनास्वप्नांतील दामुअण्णा आपल्या भयकातर आवाजांत बोलत आहेत असें त्यांना वाटलें.

" तुम्हा पांढरपेशांचा आम्हां कष्टकरी गरिबांविरुद्ध कट झालेला असतो. आम्हाला जीव–आशा इच्छा आहेत, आम्हाला पण जगायचेंय् याची तुम्हा लोकांना दाद नसते...हा तुमचा आळशांचा कारकून वर्ग म्हणजे, आपल्या

दडपणाखालीं खडी दाबणारा प्रचंड स्टीम रोलरच नाहीं का ? आम्हा गरिबांना कांहीं न्याय्य बाजू असूं शकते याची कल्पनाहि तुम्हाला न शिवण्या इतके तुम्ही अंध झालेले असतां. त्यांच्याकडे अनुकंपा—सहानुभूति बाळगून बघण्याचें बाजूलाच...पण आम्ही यच्चयावत गरीब लोक अशिक्षित, अडाणी, अज्ञ असमंजस—लुच्चे—धर्मभोळे नि पशू आहोंत इतक्या तुच्छतेनें तुम्ही आमच्या-कडे पाहतां. आमचा तुमचा जेथें संबंध येतो तेथें आम्हा लोकांना चिरडून टाकण्यासाठीं अमानुषपणें तुम्ही वागतां हें तुमचें तुम्हालाच कळत नाहीं. आपल्या पेक्षां गरीब—दुबळ्या वर्गाला पिळून काढण्यासाठीं एकापेक्षां एक वर्ग चढाओढ करीत, आपलें आस्तित्व टिकविण्यासाठीं काय वाटेल तें करीत नसतात काय ? असे निरनिराळे समाजाचे थर जोंपर्यंत अस्तित्वांत आहेत तोंवर मानवतेच्या भवितव्याची सुखकर कल्पना करणें सुद्धां महान् ढोंग आहे—महान् मूर्खपणा आहे. ”

येथे आनंदराव आपल्या तंद्रींतून जागे झाले तो त्यांना समोर दामुअण्णा किंवा दुसरें कोणीही दिसलें नाहीं...ते उठून येरझारा घालूं लागले होते. त्यांचें त्यांनांच चैन पडेना...

कारण त्यांच्या कानांत दामुअण्णांचें बोलणें सारखें दुमदुमत होतें... बुद्धिबळाचा ऐन रंगांत आलेला डाव जरा उधळला जावा तसें त्यांचें आत्मसंतुष्ट नि शांत मन आज उस्कटून गेलें होतें...कांहींतरी आपलें चुकलें. बरेंचसें चुकलें असें त्यांना त्यांचें मन खाऊं लागलें...पण तें काय तें नेमकें त्यांना सांपडेना... कांहींसा अंधार वाटला त्यांना आपल्यापुढें पसरलेला !

---

## १०

**सुभाताई**:—मघां येऊन गेलें मी—कधीं आलां तुम्हा बाहेरून ?

आनंदरावांच्या घरांत शिरल्यानंतर ते दृष्टीस पडतांच त्यांनीं प्रश्न केला. त्यांच्याबरोबर सुशिलाबाई पण आल्या होत्या.

**आनंदराव**:—तुम्ही काम करून ठेवलंय् ना ? निस्तरतोंय् तें मी !

**सुभाताई**:—हंसायला काय झालं ? बसा ना सुशिलाबाई. यांनीं सांगितलें तें खरें का मानायचें तुम्ही ?

**सुशिलाबाई**:—यांचा शब्द कसा मोडायचा ?

**सुभाताई**:—भागूबाई ! यांना तुमच्या घरीं येऊं नका असें तुम्ही सांगितलें कां हो ? या आज बोलल्या म्हणून समजलें मला.

**आनंदराव**:—तसें नाहीं. भय्यासाहेबांच्या संमतीनें येत जा म्हणून सांगितलें होतें. माझी दुसरी हरकत असण्याचें कारणच नाहीं.

**सुभाताई**:—वा ! वा ! वा !! शहाणेच आहांत कीं—भय्यासाहेब घरीं यांना कोणत्या झाडाचा पाला म्हणून वागवतात—इतरांच्या देखत यांना अहो जाहो म्हणतात नि मग...यांचे दुःख यांनाच ठाऊक...त्यांतून मनाला जरा विरंगुळा मिळावा म्हणून त्या येत असत तुमच्याकडे कधीं कधीं ! तो तुमचा हा आडमुठा स्वभाव ! ठीक. बिचाऱ्या आतां डोळे पुसीत बसल्या होत्या घरीं—

**सुशिलाबाई**:—नाहीं हो आनंदराव.

**सुभाताई**:—नाहीं तर काय ? यांची आई आजारी असल्याचें पत्र आलेंय् आज. तिला भेटायला पुण्यास जाऊं का म्हणून यांनीं भय्यासाहेबांना विचारलें.

**आशा**:—काय म्हणाले ?

**सुभाताई**:—म्हणाले रजा मिळणार नाहीं त्यांना.

**आनंदराव**:—त्यांनी रजा घेणें न घेणें हें त्यांच्या हातीं असतें, माझ्या माहितीप्रमाणें !

**आशा**:—पण एकट्यांना का पाठवीत नाहींत ते ?

**सुभाताई**:—ते त्यांनाच जाऊन विचार तूं.

**आशा**:—अगदींच कसे असे भय्यासाहेब ?

**सुभाताई**:—नि अगदींच कसे हे आनंदराव असे? त्यांनीं यांना इकडे येऊं नका म्हणून सांगावें?

**आनंदराव**:—नि तुम्ही मात्र मला सूतिकागृहाबाहेरच उभे करावें?

**सुभाताई**:—माझा प्रश्न नव्हता तेथें. इतर बाळंतीणींना संकोच वाटूं नये म्हणून मी तशी वागलें. तुमच्या घरीं तुमची ही सुशील पत्नी असतांना तुम्हाला भ्यायचें कारण? भय्यासाहेबांच्या मनाचा तो एक रोग–तों तुमचा हा दुसराच! लोकापवादाला फार भितां तुम्ही–मग आम्ही किती भ्यावें?

**आनंदराव**:—छान वक्त्या आहांत हं ताई तुम्ही.

**सुभाताई**:—चिडले–चिडले–आनंदराव चिडले–आशा! चहा तरी टाक बाई.

**आशा**:—चहासाठीं सबब कशाला हवीय्?

**सुभाताई**:—सुशिलाबाई! तुम्हीच करा आज. तुमचा चहा सर्वांना आवडतो.

**आनंदराव**:—वा. वा. छान! छान सूचना आहे ताई तुमची!

**सुभाताई**:—तेवढ्यासाठीं तरी! तुम्ही यांना येत जाऊं नका म्हणून सांगायचें नव्हतें...असे पाहतां काय? मी कशी येतें तुमच्याकडे.

**आशा**:—नवरा म्हणून जो मालक असतो तो तुम्हांला नाहीं.

**सुभाताई**:—त्यासाठीं तरी मी लग्न करून येतें नि चांगली वर्षभर राहतें तुमच्याकडे एकटीच. थांब!

**आनंदराव**:—माफ करा. ही उगाच धमकी कशाला?

**आशा**:—राहा तरी एकदां येऊन. पाहतें मी. मी त्याच वेळीं नेमकी माहेरीं जाईन. दादा मला बरेच दिवस बोलावतो आहे नाहीं तरी!... चला इकडची जेवणाची सोय तरी होईल. मला काळजी करायला नको.

**सुभाताई**:—एहेरे! आशा पण बरीच पुढें गेलीय् हं! बरीच शिकवलेली दिसतेय् तुम्ही तिला आनंदराव!! अगदीं पाऊलावर पाऊल टाकतेय्!

**आशा**:—मला पोपट समजतां कीं काय ताई?

**सुभाताई**:—नाहीं. या सुशिलाबाईसारखी मैना...

**सुशिलाबाई**:—ती मैना पिंजऱ्यांत आहे तरी तिला स्वत:चे पंख आहेत कीं-पडेन—मरेन अशी जबाबदारी घेऊनच ती पिंजऱ्या बाहेर उडूं पाहणार.

सुशिलाबाई हंसल्या.

**आनंदराव**:—आजचा चहा सुंदर होणार ताई. आहांत कुठें ? एक माणूस आज खुशींत आहेसें दिसतेंय्.

**सुभाताई**:—नि तें मघाशीं डोळे चोळीत होतें.....पाहिलंत बाई ! नुसत्या स्थलांतराचा परिणाम काय होतो तो ?

असें हें खेळीमेळीचें बोलणें चालू होतें. बोलतां बोलतां सुभाताईच्या बाबतींत कोणी काय काय केलें याचा विचार करायला सुरवात झाली.

**आनंदराव**:—मी त्या चौबळांकडे गेलों. त्यांनीं मला दाद लागूं दिली नाहीं. म्हणाले कोणावर अन्याय होणार नाहीं असें मी पाहिन नंतर मी यशवंतरांवकडे गेलों.

**सुभाताई**:—काय म्हणाले ते ?

**आनंदराव**:—सांगतों. पण तुम्हीं काय केलें ?

**सुभाताई**:—आज सकाळपासून भय्यासाहेबांना भेटण्याचा यत्न करतेंय् मी. सकाळीं ते कामाला गेले होते. आतां कळलंय् कीं ते साडेसातपर्यंत कचेरीं-तच बसणार आहेत. कांहीं झालें तरी आज मी त्यांना भेटणारच !

**आनंदराव**:—तुम्हीं जाणतांच कीं बोर्डाचे सभासद पैसेवाल्यांपैकीं असून त्यांची निवड अशी कधीं कुणीं केलेली नाहीं. नि जे सभासद भय्यासाहेबांनीं नेमून घेतले ते प्रत्येक जातीचा एक पुढारी म्हणूनच ! कोण कोणाला जबाबदार नाहीं. अशा स्थितींत मी ठरवलें होतेंच कीं भेटायचें तर यशवंतरावांस भेटावें. ते जरी वयोवृद्ध पेन्शनर असले तरी त्यांचा प्रामाणिकपणा नि हातीं घेतलेल्या कामाचा जिव्हाळा शंकातीत असतो. सत्य कळेपर्यंत ते निमूट राहतील. पण एकदां कां त्यांना कळलें कीं त्याचा पाठपुरावा करून विरोधकांच्या चिंधड्या उडवतात ते आपणहून कोणत्या भानगडींत पडायचे नाहींत ते ! पण जर का

एकादी न्याय्य बाजू त्यांनीं धरली तर त्यांत यश मिळविल्याशिवाय राह्यचे नाहींत ! नांवाप्रमाणेंच खरोखर आहेत ते.

**सुभाताई**:—फार वाहलांत तुम्हीं ! माहीत आहे तुम्हीं लेखक अहां तें. तरी बरें एकहि पुस्तक चांगलें नाहीं तुमचें !

**आनंदराव**:—आभारी आहें तुमचा ! यशवंतरावांना कळलेली हकीकत त्यांनीं मला निवेदन केली. खुद्द भय्यासाहेबांनींच चौबळ वकीलांना आपल्या घरीं बोलावून आणून त्या शहाणेबाईंचा असा एक जबाब आनंदरावांपाशीं आहे असें सांगितलें. त्यामुळेंच चौबळ वकील कामाला लागले.

**सुभाताई**:—त्यांनीं असें सांगितलें ?

**आशा**:—त्यांच्यावर विश्वास ठेवून आपण वागलों, त्यांनींच हें किटाळ उठविलें ! गंमत आहे म्हणायची ?

**आनंदराव**:—यशवंतराव खोटें बोलायचे नाहींत. खुद्द श्री. चौबळ वकील एकदां लहरींत येऊन क्लबमध्यें त्यांच्याशीं बोलले...गाडीला वेग घेण्यांत आला...आणि उडायची तितकी धूळ उडत गेली...

**सुशिलाबाई**:—म्हणजे ?

**आनंदराव**—पुष्कळ रंग चढेल या प्रकरणाला...मी कांग्रेसवाला आहे, म्हणून सरकारी अधिकाऱ्यांचा मी द्वेष करतों असे वाटतंयू त्यांना... सरकारी अधिकाऱ्यांच्या तंत्रानें कोणतीहि सार्वजनिक संस्था चालविली जाऊं नये अशा मताचा मी आहे. हें खरें आहे कारण बहुजन समाजाचा पाठिंबा मिळवतांना ती संस्था लोकशाहीच्या विस्तृत तत्त्वावर चालविली जाणार आहे याची सर्वांना खात्री वाटायला पाहिजे असे मी मानतों म्हणून सूतिकागृहासाख्या लोकोपयोगी संस्थेचे अध्यक्ष भय्यासाहेबांसारखे सरकारी आहेत त्यामुळें मी त्या संस्थेची बदनामी करण्यास प्रवृत्त झालों असून ताईच्या मध्यस्थीनें हें प्रकरण शिजविलें. मीच त्याचा वर्तमानपत्रांत गाजावाजा केला. अशा तऱ्हेचा मोठा आरोप माझ्या विरुद्ध बोर्डाच्या सभेंत मांडला जायचा आहे. त्यावेळीं ह्या संस्थेची अब्रु टिकवण्यासाठीं इतर सर्व पक्ष बद्ध परिकर झाले आहेत. ताई ! तुमचे हें

प्रकरण म्हणजे कांग्रेस विरुद्ध इतर पक्ष असा लढा होऊन राहिला आहे! बोला आतां!!

असें म्हणत आनंदराव हंसले...

**सुशिलाबाई**:—किती साधी गोष्ट! पण तिला राजकारणाचें मोठें स्वरूप देण्यांत आलेंय्! लोकांना दुसरीं कामेंच नसतात कीं काय? बायकांच्या जन्माला या म्हणावें.

**आनंदराव**:—नि वनिता मंडळें स्थापा—

**आशा**:—पण मी म्हणतें भय्यासाहेबांनीं निदान असें कां मानावें? इकडे विचारायचं होतं त्यांनीं एका शब्दानें!

**आनंदराव**:—कां मानावें? माणसाच्या अंगावर आलें म्हणजे तो शिंगावर घेणारच.

**सुभाताई**:—म्हणजे माणसाच्या मनावर शिक्षणाचें कांहीं संस्कार होतच नाहींत असें म्हणावें लागतें...

**आनंदराव**:—ठोकळ मानानें हें खरें आहे...सांवरीच्या झाडावर पांढरे स्वच्छ बगळे बसले तर त्या कांटेरी झाडाला क्षणभर शोभा येईल...म्हणून त्याचे कांटे कांहीं कमी व्हायचे नाहींत कीं त्याचीं ती तांबडीं बेढब फुलें सुगंधित व्हायची नाहींत...पण सगळींच झाडें कांहीं सांवरीचीं नसतात—एकाद दुसरें सोनचाफ्याचें पण असूं शकतें.

**सुभाताई**:—कविता करतां कीं काय तुम्हीं? वा! सुंदर—फारच वास सुटलाय हं!

**आशा**:—गप्प बसा ताई—काय म्हणत होतें मी—हं! निदान भय्यासाहेबांनीं ताईची बाजू ऐकून तरी घ्यायला नको होती कां? त्यांचा आपला परिचय इतका खास आहे.

**आनंदराव**:—ते न्यायाधिश असले तरी त्यांनीं आपणाला न्याय द्यावा असें अपेक्षिणें धाष्टर्याचें नाहीं कां? तें राहूंद्या ताई! तुम्हीं जबाब काय दिला चिटणीसांना लिहून?

**सुभाताई**:—काय देणार दुसरा ? अगदीं सरळ सरळ खरें तेंच सांगून मोकळी झालें !

**आनंदराव**:—मग आपल्याला भ्यायचें कारण नाहीं...पण कोण कोण हजर होते तुमचा जबाब घेते वेळेस ?

**सुभाताई**:—नगर पालिकेचे चिटणीस होते. नाथूराम शेठ होते. आणि ते काळेलेसे मराठा गृहस्थ–काय त्यांचें नांव बरें–? हं ते देसाई होते.

**आनंदराव**:—तुमच्याकडे कोण कोण येत असत हें विचारलें त्यांनीं.

**सुभाताई**:—कोणी येत नसे पुरुष माणूस म्हणून मी सांगितलें.

**आशा**:—पण तुम्हीं आजारी असतांना सुशिलाबाईंना घेऊन आले होते भय्यासाहेब तुमच्या समाचारासांठीं तीनदां;

**सुभाताई**:—तें त्यांचें नसतें ' येणें ' नव्हतें. नि त्यांना कशाला त्यांत गुंतवा ? स्नेहाचा असा फायदा घेणे बरें नाहीं वाटलें मला.

**आनंदराव**:—पण मी तुमच्या खोलींत पाऊल टाकलें नसतांना माझें नांव मात्र गोवलें गेलें. आश्चर्य नाहीं का ?

**सुभाताई**:—उघड उघड आपण फिरायला गेलों होतों. तुमचा माझा स्नेह नाहीं असें मी कोणत्या तोंडानें म्हणूं ?

**सुशिलाबाई**:—जातें बाई मी ? एकाद वेळेस त्यांचा निरोप बिरोप यायचा.

इतका वेळपर्यंत निमुटपणें ऐकणाऱ्या सुशिलाबाई उठून गेल्या. जातांना त्यांनीं एक दीर्घ श्वास सोडलेला सर्वांनीं ऐकला.

**आशा**:—कसें होणार यांचें कुणास ठाऊक ?

**सुभाताई**:—काय व्हायचंय् ? आणखी दोनतीन मुलें होतील त्यांना. आतांच किती फिकट दिसायला लागल्यात त्या ! तोंडावरचा लालसर तजेला पार उडून गेलाय् ! कदाचित् या खेपेला तिला कसला तरी रोग कायमचाच जडेल.

**आनंदराव**:—नि भय्यासाहेब आपली चाळीशी उलटल्यावर दुसरें लग्न करतील.

**सुभाताई:**—पण तुम्ही दोघंहि चुकतांय्! अजूनहि त्या किती सुंदर दिसताहेत! तीन मुलांची आई आहेत त्या हें सांगूनहि खरें वाटायचें नाहीं कुणाला!

**आशा:**—आपली पत्नी सुंदर आहे हें भय्यासाहेबांना माहित आहे म्हणूनच सुशिलाबाईंची कुचंबणा चाललीय्.

**सुभाताई:**—नि त्यामुळेंच कदाचित ते त्यांना एकादे वेळ गळा दाबून ठार मारतील अशी भीति वाटतेय् मला...मत्सर मोठा कठीण असतो...

**आनंदराव:**—म्हणून तर मी जपत असतों. नि तुम्ही त्यांचा कड घेऊन आलांत!

**आशा:**—मृदंगाला दुहींकडून मार!

त्या दिवशीं सुभाताई तेथेंच जेवायला राहिल्या. नि सुमारे साडे-आठच्या वेळेला त्या भय्यासाहेबांना भेटण्यास म्हणून निघाल्या.

**आशा:**—यश येवो ताई तुम्हाला. शकून पाहून बाहेर पडा!

**सुभाताई:**—छाती नाहीं भय्यासाहेबांची धडधडीत खोटें बोलायची.

त्या पूर्ण विश्वासयुक्त अंतःकरणानें भय्यासाहेबांच्या बंगल्यावर आल्या. सुशिलाबाईकडून कळलें कीं ते नुकतेच जेऊन माडीवर गेले होते.

**सुशिलाबाई:**—थांबा, बोलावतें त्यांना मी खालींच. काय व्हायचें तें माझ्या देखतच होऊं द्या.

सुशिलाबाई हें कांहींशा निर्धारानें बोलल्या. त्यांची आजची वृत्ति नेह-मींची नव्हती. त्यांच्या मनांत आहे तरी काय याची सुभाताईंना कल्पना येईना. त्यांनीं तडक एका पट्टेवाल्याबरोबर निरोप पाठवून भय्यासाहेबांना खालीं माज-घरांत बोलावलें.

ते तेथचा जिना उतरून येत होते. जिन्याच्या रमण्यावर आलेले दिसतांच सुभाताई सांवरून बसल्या.

**सुशिलाबाई:**—ताई आल्या आहेत आपल्याकडे.

**भय्यासाहेब**—काय काम आहे ?

रमण्यावरूनच त्यांनीं सुभाताईंना एकदम विचारलें.

**सुशिलाबाई**—आपल्याशीं बोलायचंय् त्यांना कांहीं.

**भय्यासाहेब**—पण एवढ्या रात्रीं माझ्याकडे त्या आल्या ? भय्यासाहेबांच्या या कांहींशा त्रासिक स्वरोच्चारामागची ओंगळ भूमिका ताईंच्या लक्षांत आली.

**सुभाताई**—काय हो ? तुम्ही मला समजतां कोण एवढ्या रात्रीं तुमच्यांकडे मी आलेंय् म्हणून ? संतापलेल्या सुभाताईच्या तोंडांतून हे शब्द कानीं पडतांच भय्यासाहेब चपापले. ते रमण्यावरून खालीं उतरूं लागले.

**भय्यासाहेबः**—रागावला कीं काय तुम्हीं ? बसा–बसा–बसाना !

**सुभाताईः**—नाहीं म्हटलं तुमच्या बोलण्याचा अर्थ काय होतो ?

**भय्यासाहेबः**—बरं–बरं...काय काम आहे बोला तर खरं !

सुभाताईंनी सूतिकागृहावर प्रवाद यावा म्हणून त्या बाईचा जबाब घेतला नव्हता. म्हणूनच, त्यांना येतां आलें नव्हतें तरी त्यांनीं तो आनंदरावां-करवी त्यांना पाह्यला पाठविला होता. ही गोष्ट त्यांनीं बोर्डापुढें सांगावी अशी त्यांनीं विनंति केली.

**सुभाताईः**—माझ्या मनांत तसें कांहीच नव्हतें म्हणून मी तो तुम्हांला दाखविला...नाहीतर शक्य होतें कां ?

**भय्यासाहेबः**—बरं ! सागेन बोर्डाला मी हें.

**सुभाताईः**—तें सांगायला उद्यांच्या सभेला हजर राह्यला हवंय्. उप-कार होतील तुमचे माझ्यावर ! आजच्या सभेला हजर नव्हतां म्हणून मी पुन्हां तुमची विनंति करतें...

**भय्यासाहेबः**—एवढें काय आहे त्या प्रकरणांत ? भारीच भितां तुम्हीं ताई...मी उद्यां हजर राहणार आहे.

**सुशिलाबाईः**—एक गोष्ट विचारूं का ?

**भय्यासाहेबः**—ह्यॅ ! ह्यॅ ! ह्यॅ ? तुम्हांला कशाला हवीय् माझी परवानगी ?

**सुशिलाबाईः**—गावांत सर्वांच्या तोंडी झालंय्. या जबाबाची हकीकत प्रथम आपणच चौबळ वकीलांच्या कांनीं घालून त्या बाबत तपास करून त्यांना सावध राहण्यास सांगितलें म्हणतात. खरं का ?

**भय्यासाहेबः**—कुणी सांगितलें हें तुम्हांला ?

**सुशिलाबाईः**—पण खरें आहे ना हें ?

**भय्यासाहेबः**—तुम्हांला काय करायचंय् नसत्या चौकशा करून ? तुमचें हें काम नव्हें !

असें म्हणून रागावलेले भय्यासाहेब तो जिना चढून निघून गेले. त्यांनीं माघारीं वळून सुभाताईकडे पाहण्याचें सुद्धां सौजन्य दाखविलें नाहीं.

**सुभाताईः**—कशाला धाडस केलंत भलतेंच तुम्हीं हें माझ्यासाठीं ?

**सुशिलाबाईः**—मैत्रिणीसाठीं...नि होय !!...मित्रासाठीं !

**सुभाताईः**—कसं हो होणार तुमचें ?

**सुशिलाबाई**:—घालवून तर नाहींना देत घरांतून ?

दाट–गडद अंधार दिसत होता सुभाताईंना पुढें ! एकहि चांदणी लुकलुकतांना पडली नाहीं त्यांच्या नजरेस ! झाडाचें एक पानहि हालत नव्हतें–वाराही पार पडला होता–रात्र मात्र किर्रर्र करीत होती. त्या बाहेर पडल्या.

---

# ११

कुठें पाणी मुरलें कुणाला ठाऊक ?...सूतिकागृहाच्या बोर्डाची तांतडीनें भरायची दुसऱ्या दिवशींची सभा एक आठवड्यानंतर आंबेगांवच्या नगरपालिकेच्या कचेरींत भरली होती.

एवढ्या अवधींत ही सारी हकीकत ‘ कामकरी ’ या एका राजकीय पक्षाचे मुखपत्रांत येऊन गेली. त्यांत आनंदरावांसारख्या कॉंग्रेसवाल्यांच्या चारित्र्यावर कलंक आरोपित करणारे असे दोन विस्तृत लेख प्रकाशित होऊन गेले होते.

ते वाचणाराला आनंदराव हे बदफैली, ढोंगी, नादान गृहस्थ असून शिष्ट म्हणून ते समाजांत वावरत आहेत असें वाटलें तर नवल नव्हतें. अशा आचारशून्य लोकांचा कॉंग्रेसमध्यें भरणा आहे. हे महात्मा गांधींची अहिंसा–सत्य हीं तत्त्वें खुंटीला गुंडाळून ठेवतात असें लिहून तिला नागिणीच्या उदाहरणानें लेखकानें आपला लेख संपविला होता.

त्याच सुमारास शामरावांची स्वारी गांवांत, गेला आठवडाभर सारखी हालत होती. कंत्राटी—नोटीशी—वकीला पासून तो थेट तांबोळयाच्या दुकाना-पर्यंत, खासगी सरकारी डॉक्टरांपासून लोकल बोर्डांतील कारकूनापर्यंत त्यांनीं आपले मोर्चे मजबूतपणें लावले होते आनंदराव हा घातकी मनुष्य असून त्यानें त्या शहाणेबाईचें आंगठे डझनभर कोऱ्या कागदावर उठवून घेतले आहेत. हेड नर्स आणि आनंदराव यांची दोस्ती असून ती त्यांच्याकडे वाटेल तेव्हां उघडउघड जात असते. इतकेंच नाहीं तर आनंदरावही सूतिकागृहांत रात्री बे रात्री जात असतात ! नि नर्सनें हें आपल्या जबाबांत स्पष्टपणें कबूल केलें आहे. हें सिद्ध करण्यांसाठीं पुरावा म्हणून नर्सनें दिलेल्या जबाबाची नक्कल ते प्रत्येकाला दाखवीत सुटले होते. असले अनीतिमान लोक ज्या कॉंग्रेसमध्यें प्रतिष्ठितपणें मिरवतात ती कॉंग्रेस सर्वांनीं सोडून देऊन पवित्र हिंदुसभेच्या निशाणींखालीं जमा व्हावें. असें जर आपण धैर्यानें नीतीनें वागलों तर हिंदुस्थानचें स्वातंत्र्य हां हा म्हणतां मिळवितां येईल अशा तऱ्हेनें बडबडत शामराव आनंदरावांवरचा आपला सूड उगवीत होते. कारण विश्वनाथ काळ्यांना पन्नास रुपये दंड झाला होता.

त्या दिवशीं आनंदराव यशवंतरावांना भेटून आले. राजकीय अभिनिवेशाचा अंमल चढलेल्या त्या जातीनिष्ठ बोर्डाच्या आजच्या निकालावर त्यांचे उर्वरित जीवन नि सुभाताईचें पुढील आयुष्य अवलंबून होतें.

सभा भरली...भय्यासाहेब कांहीं जरुरीच्या कामासाठीं महाबळेश्वरास गेले होते. अध्यक्षस्थानीं श्री. चौबळ वकील विराजमान झाले...आपल्या हातीं अस-लेल्या जबाबावरून सुतिकागृहाच्या श्री. चिटणीसांनीं त्या प्रकरणांतील सर्व हकीकत त्या बोर्डापुढें मांडली.

**यशवंतराव**:—नर्सबाईचा पहील्या सभेपुढचा जबाब काय आहे ?

**चिटणीस**:—हा पहा घ्या !

**यशवंतराव**:—नको–तो तुम्ही वाचून दाखवा–सर्वच्या सर्व–आहे तसा !

चिटणीस तो लांबलचक जबाब वाचीत होते. यशवंतराव तो लक्षपूर्वक ऐकत होते. जबाब वाचून पुरा झाला. श्री. चिटणीस महाशय खुर्चीवर बसले. त्यांनीं आपल्या चेहऱ्यावरचा घाम पुसला.

**यशवंतराव**:—मी कांहीं खुलासा विचारूं का चिटणीसांना ?

**श्री. चौबळ**:—विचारा ना !

**यशवंतराव**:—आपला पक्ष कोणता ?

**श्री. चिटणीस**:—हें काय विचारणें ? मी हिंदूमहासभेचा कार्यकर्ता आहे हें सर्वांना ठाऊक आहे.

**यशवंतराव**:—आनंदराव हे कॉंग्रेस कार्यकर्ते आहेत हें पण गांवाला ठाऊक आहे. खरें ना ? ठीक...या जबाबांतील हकीकत सहीसही 'कामकरी' मध्यें कशी आली ?

**श्री. चिटणीस**:—मला माहित नाहीं.

**यशवंतराव**:—नक्की माहित नाहीं ? बरें ! आनंदरावांचें काय म्हणणे आहे या प्रकरणीं हें अजमावण्यासाठीं त्यांचा जबाब घेतला का ?

**श्री. चिटणीस**:—जरुरी वाटली नाहीं !

**यशवंतराव**:—अस्सें ? निदान त्यांच्या पत्नींचा तरी जबाब घ्यायला हवा होता. कारण शहाणेबाईंचा पहिला जबाब त्यांच्या हस्ताक्षरांत होता असें आपण आतांच सांगितलें आहे. आपले म्हणणे सिद्ध करायला तरी त्यांचा जबाब घेणें रास्त वाटले नाहीं ?

**श्री. चिटणीस**:—नाहीं घेतला.

**यशवंतराव**:—मग ते त्यांचे हस्ताक्षर आहे असें आपण कसें विधान करतां ?

**श्री. चिटणीस**:—शहाणेबाईंनीं आपल्या दुसऱ्या जबाबांत त्यांचेंच नांव घेतलें त्यावरून—

**यशवंतरावः**—शहाणेबाई कशावरून खरें बोलत आहेत? म्हणून म्हणतो कीं सौ. वैद्य यांना बोलावून त्यांची बाजू आतां तरी विचारांत घ्यावीशी वाटते का?

**श्री चिटणीसः**—बोर्डाची इच्छा असल्यास घेतां येईल.

**यशवंतरावः**—ठीक—तें पाहूं पुढें.....अध्यक्ष महाराज याची नोंद करावी आपण...त्यापूर्वी बोर्डाला माझी अशी विनंति आहे कीं नर्सबाईना प्रत्यक्ष खुलाशासाठीं बोर्डासमोर बोलवावें—मला वाटतें, हजर आहेत त्या खालीं.

श्री. चौबळ वकीलांनीं नर्सना वर सभेच्या ठिकाणीं बोलावलें. त्यावेळीं श्री. चिटणीस बराच वेळ चुळबुळ करीत असलेले स्पष्टच दिसत होते. सुभाताई आल्या.

**श्री चिटणीसः**—त्यांना खुर्ची द्यारे- कुणीतरी—आहे का तिकडे कोण?

**यशवंतरावः**—हे पहा बाई? तुमचें वय काय?

**सुभाताईः**—एकुणचाळीस.

**यशवंतरावः**—आनंदराव वैद्यांना ओळखतां तुम्ही? त्यांचे वय काय?

**सुभाताईः**—असेल तिशीच्या आंत.

**यशवंतरावः**—हे पहा! हा तुमचा जबाब! खरें ना? यांतील चौथ्या पानावरचें नववें वाक्य वाचा पाहूं.

**सुभाताईः**—वाचतें पण...मी असे नव्हतें बोललें!

**यशवंतराव**—मग काय बोललां होता? आठवतें कां?

**सुभाताईः**—श्री. वैद्य हे त्या दिवशीं सायंकाळीं सूतिकागृहापर्यंत आले होते असें म्हटलें होतें. आंत आले होतें असें मुळीच सांगितलें नव्हतें.

**यशवंतरावः**—काय हो! हा जबाब तुम्हीं लिहून घेतला ना?

श्री. चिटणीसांनीं आपली मान होकारार्थी हालविली.

**यशवंतरावः**—अध्यक्ष महाराज! आपण आपल्या गांवांतील एक सन्मान्य थोर असे वकील आहां. आपली न्यायप्रियता सर्व जाणतात. आपला

ह्या जबाब घेतला गेला त्यावेळीं हजर होतां. खरें काय सांगितलें या बाईनीं आठवतें आपणांस ? नाथूरामभाई तुम्हीं होतां. मिस्टर देसाई तुम्हीं पण होतां. तुम्हाला आठवत असेल तें खरें खरें उत्तर द्या...सेक्रेटरी मिस्टर तांबे तुम्हीं पण होतां ना ?

यशवंतरावांच्या या आत्मविश्वासयुक्त भाषणाचा परिणाम व्हायचा तोच झाला !

**श्री. तांबे**:—सूतिकागृहापर्यंत असें सांगितल्याचें मला तरी स्मरतें.

**श्री. देसाई**:—मलाहि आठवतें तसें !

**नाथूरामभाई**:— हुं पण एमज धारूं छुं.

**यशवंतराव**:—सभासद हो ! अशा रीतीनें एका शब्दाच्या फरकानें गांवांतील एका सभ्य नागरिकावर केवढा घोर अन्याय झाला आहे याचा विचार करा. मला असें मुळींच म्हणायचें नाहीं कीं आपल्या बोर्डाचे सभासद श्री. चिटणीस आपल्या पक्षांधत्वामुळें श्री. वैद्यांसारख्या कांग्रेसनिष्ठावर किळसवाणे आरोप सिद्ध व्हावेत म्हणून ' पर्यंतचे ' ' आंत ' करतील ! ते एक होतकरू वकील आहेत. चतुर आहेत. बहुश्रुतहि आहेत. त्यांच्या हातून असें कृत्य झालें असेल असें मला म्हणायचें नाहीं. त्यांनीं आपल्या सूतिकागृहाच्या कारभारांत राजकारण आणून आपल्या बोर्डाची इभ्रत कमी केली आहे असे मी मुळीं म्हणत नाहीं. ते एक सन्मान्य नागरिक आहेत. आपल्या बोर्डाचे उत्साहि सभासद आहेत. त्यांची कार्यक्षमता वाखणण्यासारखी आहे. त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

**श्री. चिटणीस**—अध्यक्ष महाराज ! माझ्यावर हा उघड हल्ला आहे. श्री. चौबळ हे पार्लमेंटरी आहे कांहो यशवंतराव ?

श्री. यशवंतरावांनीं पुढें बोलावें.

**यशवंतराव**—आभारी आहे मी आपला ! सूतिकागृहाच्या हेड नर्सला ताबडतोबीचा हुकूम पाठवून आपल्या घरीं बोलावून घेण्याचा यांना अधिकार आहे कां ? रेकॉर्ड आहे ?

**श्री. चौबळ**:—बाई ! तुम्हीं आतां गेला तरी चालेल.

**यशवंतराव**—शिवाय आपल्या बोर्डाच्या सभासदांव्यतिरिक्त दुसऱ्या माणसाजवळ नर्सबाईच्या जबाबाची प्रत देण्याचा अधिकार श्री. चिटणीसांना बोर्डानें कोणत्या ठरावान्वयें दिला आहे ?

**श्री. चौबळः**—तसा ठराव कसा असेल ?

**यशवंतराव**—तर मग शामरावसारख्यांच्या हातांत त्या जबाबाची बरोब्बर नक्कल कशी गेली ? त्यानें ती प्रत्यक्ष मला दाखविली माझ्याकडे येऊन ! मी वाचली आहे ती.

चिटणीस खाली मुंडी घालून गप्प बसले होते.

**यशवंतरावः**—ठीक आहे ! चिटणीस माझे आरोप नाकबूल करीत नाहींत ! त्यांना अधिक विचारण्यांत माझा सभ्यपणा दिसणार नाहीं असें मी मानतों. मला या प्रसंगीं बोर्डापुढें एवढेंच सांगायचें आहे कीं श्री. वैद्यांसारख्या सज्जनांचीं मनें कांहींहि असोत. सूतिकागृहासारखी सार्वजनिक संस्था जनतेच्या प्रतिनिधींच्या हातीं असावी असें वाटते. असो. त्यासाठीं तें तशा अशिष्ट पद्धतीचा अवलंब करतील असें समजपणें हा आपल्या मनाचा दुबळेपणा होय.

यशवंतराव अगदीं रंगांत येऊन बोलूं लागले होते. जणूं त्यांची अंतःस्फूर्ति जागृत झाल्याप्रमाणें एखाद्या प्रतिभावान वक्त्याप्रमाणें ते बोलूं लागले होते.

सरकारी नोकरांची किंवा सरकारशीं—सरकारी अधिकाऱ्यांशीं संबंधित अशा संस्थातून कामें करणारांची सर्वसाधाराण जनतेनें मानलेल्या देशसेवकांविषयीं भावना शुद्ध असूं शकत नाहीं असा यशवंतरावांचा अनुभव होता. लोकमान्य टिळकांपासूनच्या चळवळ्या लोकांना ते बेजबाबदार आणि कांहींतरी हुल्लड माजविणारे जहाल वृत्तीचे लोक म्हणून समजत होते. आपली लोकप्रियता वाढावी म्हणून वाटेल त्या मार्गानें स्वदेशी भक्तीचा टेंभा मिरविणाऱ्या लोकांचे पुढारी आहेत म्हणून सरकारनें दडपशाही करून अशा लोकांना ठेंचून काढायलाच हवे. हे ते मनोदय मानीत आले होते. पण त्यांनीं पेन्शन घेतल्यापासून नोकरीच्या ठरविकांतून बाहेर पडल्यानंतर आजूबाजूच्या समाजांत ते डोळे उघडे ठेवुन बघूं लागले होते. अनेक इतर सामाजिक क्षेत्रांत कामें करीत असतांना अशा कांहीं लोकांशीं त्यांचा परिचय झाला. त्यावरून ते चळवळे लोक प्रामाणिक

असूं शकतात याची खात्री झाली. आणि यशवंतराव स्वतः प्रामाणिक असल्यामुळें विचार करूं लागले.

राष्ट्रीय भावनांनी तळमळणाऱ्या, त्यासाठी येईल तो त्याग करूं पाहणाऱ्या लोकांचीं सत्कृत्यें जनतेला पटतात. तिचा त्यांच्यावर विश्वास वाढतो. त्यांच्या उलट परकीय सरकारची नोकरी करण्याबाबत जनतेंत तिरस्कार उत्पन्न होतो. अर्थात् त्यांच्यावर जनतेचा विश्वास असत नाहीं. इतकेंच नाहीं तर त्याच्या प्रत्येक कृतीकडे जनता साशंकतेनें बघत असते. ही परिस्थिति बहुतेक सरकारी अंमलदारांची शांति ठिकाणावर ठेवीत नाहीं. सरकारची नोकरी करणें समर्थनीय आहे असें त्यांना म्हणतां तर येत नाहीं. नि तसें वाटलें तरी ती सुखासीन जागा सोडण्याचें त्यांना क्षणाक्षणाला जागवत असते. ते लोक ज्यांना वेळीं सरकारी नोकरांच्या संबंधांत त्या त्या वेळीं जरूर म्हणूनच त्यांना मानीत असतात. त्यांत त्यांचा जिव्हाळा नसतो. तें नाटक असलें हेंही ते अधिकारी जाणतात ? सरकारी नोकरीवर अधिष्ठित होणारे अधिकारी सरकारच जेथें जनतेचें हित करण्यास बांधलेले नाहीं तेथें लोकांचें हित करूं शकत नाहींत, नि अशा वैफल्याची जाणीव सरकारी नोकरांना रात्रंदिन बेचैन करीत असते.

अर्थात बहुतेक अधिकारी त्या लोकप्रतिनिधींना आततायी म्हणून समजून आत्मवंचनेंत गर्क होऊन गेलेले असतात. त्या लोकांचे स्वातंत्र्यसंपादनाचे मार्ग चुकीचे आहेत हे वेळीअवेळी सप्रमाण दाखवून देण्यांसाठी अधिकारी वर्ग आपली बुद्धिमत्ता वापरीत असतो. आपली चूक करतो याची जाणीव आपल्या संबंधितांना—किंबहुना आपल्या अंतर्मनाला सुद्धां होऊं नये म्हणून राष्ट्रीय बाण्याचीं वृत्तपत्रें तत्सम पुस्तकें आपल्या घरांतच येऊं नये अशी काळजी मी वाहतो उलट अराष्ट्रीय वृत्तपत्रें वाचून मिळणाऱ्या तुटपुंजा आधारावर तो आपलें आत्मसमर्थन करीत समाधान मानीत राहतो. तेवढेंच त्याचें कार्यक्षेत्र राहातें. असा हा अधिकारी वर्ग याच्यापुढें जाऊनहीं वागण्यास कचरत नाहीं जनतेला प्रिय असणारे, त्यांची सेवा करूं पाहणारे त्यागी लोक हे खरोखर दिसतात तसे नाहींत हें हुडकून

काढण्यासाठीं आटापीट करीत राहतो. कोणताहि मानव पूर्ण असूं शकत नाहीं हे त्यांना माहीत असूनहि ते विशिष्ट लोक अपूर्ण, अगदींच सामान्य आहेत हें सिद्ध करण्यासाठीं त्या त्या लोकांचे दुर्गुण शोधून त्यांना नि ते ज्या ज्या संस्थांत असतात त्या संस्थांना जनतेच्या दृष्टीनें कमीपणा आणण्याचा मार्ग शोधीत असतो. अशा रीतीनें आपली जागृत अंत–प्रेरणा ठेंचून मारीत असलेला अधिकारी वर्ग, आपण, वागतों–बोलतों तेंच बरोबर आहे असें मानून आपली फसवणूक करीतो हा त्यांचा फसवा अहंगंड त्याच्या मनाला जडलेला भयंकर रोग ठरतो. नि त्यामुळें शेवटीं आपण आपलें कुटुंब, नि आश्रित या शिवाय दुसऱ्या विस्तृत भूमिकेवरून जगाकडे पाहण्याचें तो बंद करतो–त्याचे जग अगदींच लहान–व्यक्तिनिष्ठ राहतें......तो आपल्याच फसव्या विचारांचा तुरुंग करून त्यांत बसून मी नि माझें करीत राहण्यांतच समाधान मानतो...

**यशवंतराव**:—सभासद हो! मला इतकेंच सांगायचंय् कीं आपण मानतों वा वागतों तेंच समर्थनीय आहे असें जर आम्हीं अधिकारानें म्हणूं शकतों, तर तसें श्री. वैद्य यांनाहि म्हणता येईल! नि हें जर या प्रसंगीं आपण जाणलें तर श्री. वैद्य यांनीं गेले पंधरा वीस दिवस सोसलेल्या मानहानीचे नि मानसिक यातनांचें परिमार्जन होईल असें मला वाटतें.

**श्री. चौबळ**:—तें असो! या आपणापुढच्या प्रकरणाचा निकाल काय लावायचा?

**यशवंतराव**:—मला वाटतें, याच्यामागील कारस्थानाचा विचार न करतां नर्सबाईचा राजिनामा मंजूर करावा.

सुभाताईनीं तें सूतिकागृह स्थापन झाल्यापासून उर्जितावस्थेला आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला म्हणून त्यांना दोन महिन्याच्या पगाराची ग्रॅच्युइटी देण्यांत आली.

**यशवंतराव**:—कोणत्याहि नर्सनें सूतिकागृहाच्या कामाशिवाय बोर्डाच्या अध्यक्षांच्या परवानगीवांचून बाहेर जातां कामा नये. असा एक नियम करून तो गृहाच्या बोर्डावर लावावा.

यशवंतरावांची ही सूचना मोऱ्यांच्या मर्मस्थानीं झोंबली. पण ते कांहींच बोलूं शकले नाहींत.

सूतिकागृहाच्या नर्सवर ठपका ठेवण्यासाठीं भरलेली गाजलेली ती सभा त्यांचा गौरव करून संपली.

**यशवंतराव**:—मला खात्री आहे. तुम्हीं आपली दृष्टि जरा साफ ठेवून जगाकडे पाहूंला लागाल ! काय हो ?

जिन्यावरून उतरत असतांना यशवंतराव त्या चिटणीसांना उद्देशून बोलले...

त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं म्हणून यशवंतराव मात्र मुद्दाम हंसले.

---

# १२

शिमगा गेला तरी कवित्व राहतेंच ! चिंच खाल्ली—ती पचूनहि गेली, तरी दांत आंबलेले राहतातच कांहीं काळ ! तसेंच तें नर्स प्रकरण आंबेगांवांत इतके गाजल्यानंतर, त्याचा बोर्डाच्या सभेंत सोक्षमोक्ष लागला तरी आनंद-रावांवर व्हायचे ते आरोप होतच होते. धडाडून पाऊस पडून जातो, कमकुवत माणसांच्या हृदयांत कंप उठविणारे मेघाचे गडगडाट होऊन जातात...विजा कडाडतात...तरी सुद्धां पाऊस थांबल्यावर एकादे वेळेस इंद्रधनुष्य दिसून मनाला आल्हाद व्हायचा संभव असतो. निदान रम्य अशी हिरवळ नजरेस पडून झाडें तरारून टवटवीत झालेलीं दिसतात तें बघून आपली मनस्थिति टवटवीत व्हायचा संभव असतो.

पण या लोकापवादाच्या-नि मनमानेल त्या चर्चेच्या कचाट्यांतून आनंदराव लवकर सुटतीलसे दिसलें नाहीं.

उलट आनंदरावांनीं भय्यासाहेबांसारख्या आपल्या स्नेह्याला मध्यस्थी घालून लोकशाहीच्या थापा मारून ज्या संस्थेला अजूनपर्यंत त्यांनीं विरोध दर्शविला त्याच संस्थेला अडीचशें रुपये देणगी दिली आणि श्री. चौबळ वकीलांच्या मदतीनें हें प्रकरण आपसांत तडजोडीनें मिटविलें नाहींतर त्या व्यभिचारी आनंदरावांची खैर नव्हती. असें शामरावांसारखें कज्जेदलाल महान् उद्योगी लोक गांवांत बोलत फिरतच होते.

कोठल्याहि तऱ्हेनें कोणावर दडपण न आणतां आपली न्याय्य बाजू बोर्डाच्या सभासदांनीं मान्य केल्यानंतर एवढा शिमगा गर्जत असलेला पाहून आनंदराव उद्विग्न झाले. क्षण भरच त्यांचा मानवांवरील विश्वास कमकुवत झाला. पण नाहीं, दुसऱ्याच क्षणीं यशवंतरावांची त्यांना स्मृति झाली.

आनंदराव, यशवंतरावांना भेटण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं जाणार होते ते या मानसिक व्यग्रतेमुळें लांबणीवर पडले...ते आज रोजीं त्यांना भेटले.

**आनंदराव**—मी आपला अत्यंत ऋणी आहे !

**यशवंतराव**—अरे बाबा ! तुझें चारित्र्य जर ठीक नसतें तर माझ्या बोलण्याला कुणीच किंमत दिली नसती—

दोन दिवसांनीं सुभाताई त्यांना भेटण्यासाठीं गेल्या...त्या गेला आठवडा-भर तापानें आजारी पडल्या होत्या.

**सुभाताई**—तुमची मी कशी उतराई होऊं ?

**यशवंतराव**—बाई ! माझें ऐकाल का ? तुमचें मन कितीहि निर्मळ नि कितीहि खिलाडू असो...लोकांना नांवे ठेवायला जागा मिळेल असें आपले वागणें-निदान अशा शहरच्या ठिकाणीं-ठेवायला पाहिजे. माझें म्हाताऱ्याचें ऐका !

**सुभाताई**—पण मी सांगतें-आनंदराव आंतून बाहेरून निष्पाप आहेत. त्याचे संस्कार शुद्ध आहेत. अशा परिस्थितींतहि माझ्यासारख्या ना नात्याच्या ना गोत्याच्या अशा एका अबलेला बहिण मानून आपला पाठिंबा दिला. त्यांनीं मला नशिबाच्या हवालीं केली नाहीं ही त्यांची थोरवी नाहीं कां ?

**यशवंतराव**—मला माहित आहे! एकादी व्यक्ति कितीहि थोर पदावर असली म्हणून ती थोर असतेच असें नाहीं.

आनंदराव जीवनाला डावलणारे नव्हते आली परिस्थिति मनाला फसवून खोटेनाटे बोलून दूर सरणारे नव्हते किंवा जगाला नांवे ठेवीत, आल्या प्रसंगानें खचून जाऊन मागें सरणारे नव्हते—न्याय्य गोष्टीसाठीं अखेरपर्यंत लढत राहणाऱ्या वृत्तीचे ते होते. पण भय्यासाहेबांसारखे अधिकारी आपल्या अधिकाराला चिकटून राहण्यासाठीं आपला मोठेपणा टिकवण्यासाठीं जीवनापासून पार पळून जातात. कोणत्यावेळीं ते कसे वागतील, कुणाला फशी पाडतील याचा नेम नसतो त्यामुळे त्यांचा समाजाशीं संबंध राहात नाहीं. नि त्यांना आपलें अस्वित्व टिकवण्यासाठीं आपल्याच वृत्तीचे—आचाराचे ढोंगी सांप्रदायाचे लोक जे असतील त्यांतच मिसळणें अपरिहार्य ठरतें...नि असे लब्धप्रतिष्ठित लोक अंमलदार, सरकारी नोकर, थकले भागलेले वकील भांडवलवाले स्वार्थी व्यापारी या वर्गांमध्येंच जास्त असतात त्यांना अर्थात पैशाची ददात नसल्यामुळें आपल्या मनोरंजनासाठीं निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्या शोधून काढतात...आणि विशेष म्हणजे या समाजापासून फारकत झालेल्या लोकांचा रोज जमून चकाट्या पिटांत काळाचा अपव्यय करण्यासाठीं म्हणून एक अड्डा तयार होतो तेथें ते खाणेपिणें टेनिस कोर्ट सुरू करतात.. नि तेच हे समाजाचे आदर्श त्या अड्याला " क्लब " हें नांव देतात:—अर्धांगवायु झालेल्या दुर्दैवी माणसाचें जसें अर्धें आंग गळून गेललें असतें, तसाच कांहींसा हा समाजातील वर्ग अगदीं असून नसून सारखाच झालेला असतो त्याचा समाजाला कांहीं उपयोग तर नाहींच, उलट भारमात्र वाहवा लागतो...आणि यांतच या वर्गाला आपल्या वर्चस्वाची खात्री वाटत असते, आपण म्हणजे देवाचे लाडके निवडक चिरंजीव समजून स्वतःला यशस्वी, धन्य समजून घेत असतात...

नि आपल्यापेक्षा जगांत कोणीहि वरचढ असतां कामा नये आपल्या कर्तृत्वानें एकाद्या माणसानें आपले वैशिष्ठ्य दाखवतां कामा नये अशा कारवाया त्यांतल्या त्यांत हे लोक करीतच असतात...आंबेगांवांतून आनंदराव वैद्यांना

उठवून लावायचा डाव हा त्यांतलाच एक मामुली नि रोजचाच प्रकार होता पण तो फसला. कांहींसा त्यांच्यावर उलटला.

सुभाताईंनीं एक भला मोठा मेवामिठाईचा करंडा यशवंतरावांच्या नातवांसाठीं पाठवून दिला...यापेक्षां निरपेक्ष यशवंतरावांची उपकृति त्या कशा व्यक्त करणार ?

मध्यंतरी पाऊण महिना तसाच गेला. मधून मधून गांवांतील लळीत सुभाताईंना ऐकावें लागतच होतें; तरी सुद्धां त्या आनंदरावांकडे मधून मधून खेप टाकून जात. पण त्या अवधींत सुशिलाबाई त्यांना भेटल्या नाहींत कीं त्या आनंदरावांकडे फिरकल्याहि नाहींत.

सुभाताईंना वाटे कीं, जावें एकदां सुशिलाबाईंना भेटावें. पण भय्या-साहेबांचें त्या दिवसाचें तुटक वागणें त्यांना आठवलें म्हणजे त्यांचा स्वाभिमान जागृत होई, त्यांच्या स्त्रीमनाला पीळ पडे आणि त्या त्यांच्याकडे जाण्याचा विचार डोक्यांतून हुसकून लावीत.

पण सुभाताईंचा नाइलाज झाला. त्यांची आंबेगांव सोडून जायची पाळी आली. ती तारिख निश्चित झाली. त्याना राहवलें नाहीं. पुण्याला निघून जाण्याच्या आदल्या दिवशीं त्या सुशिलाबाईंना भेटल्या.

बिचाऱ्या सुशिलाबाई ! बऱ्याच अशक्त झालेल्या दिसत होत्या ! ! त्या मैत्रिणींनीं आपापलीं हृदयें मोकळीं केलीं—

**सुभाताई:**—नि आपल्या वनिता मंडळाचें काय करायचें तुम्हीं अशी मनाशीं हाय खाल्ली तर ?

**सुशिलाबाई**—माझ्यासाठीं का तें काढलें होतें ? माझ्या लौकिका-साठीं नव्हतें तें. जाईना चुलींत ! मला नाहीं जमायचें आतां—थकलें या कटकटीला.

**सुभाताई:**—आशेला सांगा ! ती चालवील तें पुढें.

सुभाताईंना सूतिकागृहांत लौकर परतायचें होतें...तेथील सारी चिजवस्त आटोपून रात्रीं जेवण्यासाठीं आनंदरावांकडे यायच्या होत्या म्हणून त्या उठल्या.

**सुशिलाबाई**:—खरं का हो हें ताई ? माझ्याच्यानें ऐकवत नाहींत जगाचीं कुजबुजणीं. म्हणे गेल्या महिन्यापासून त्या काशीकरांची यमू हवेसाठीं महाबळेश्वरास राह्यला गेली आहे ? काय झालंय् हो एवढं तिला ?

**सुभाताई**:—जाऊं देत ! तुम्हीं कां भितां ? नि काळजी तरी कसली करतां ? पुरुष कांहीं आपल्या मुलाबाळांच्या आयांना एकदम टाकीत नाहींत. कायमच्या मोलकरणी सोडून दिल्या आहेत का कुणी ?

**सुशिलाबाई**:—शोभतें कां त्यांना हें ?

**सुभाताई**:—तुम्हीं विचार करकरून हा प्रश्न सुटणार नाहीं जरा सुद्धां !

त्या दिवशीं रात्रीं आनंद आशेचा निरोप घेऊन जातांना कांहींसा उलट प्रकार घडला. आशा स्फुंदत होती.

**सुभाताई**:—तुम्हीं होतां–म्हणून मी बचावलें आनंदराव–यशवंतराव माझ्या परिचयाचे थोडेच होते ? खरं सांगू ? तुम्हीं नसतां तर जीव देऊन व्हावें मोकळें या काचांतून असें दहादां मनांत येऊन गेलें.

**आनंदराव**:—वा–वा. वा ! बरं केलंत जीव दिला नाहीं तो–नाहीं तर माझी खैर नव्हती.

**सुभाताई**:—फार छान झालें असतें ? छान तुमच्या मागें जन्माचें शुक्लकाष्ठ लागून राहिलें असतें...आनंदरावांच्या भानगडीमुळें एका नर्सनें जीव दिला असें म्हणायला बरी जागा झाली असती लोकांना.

सुभाताईंना आपलें मिस्कील हसूं आवरलें नाहीं. त्या हसूं लागल्या म्हणून आनंदरावहि हसूं लागले नि मग आशेला दुसरा मार्गच नव्हता त्यांच्या त्या आनंदांत सामील होण्याशिवाय !

**आशा**:—पुन्हा केव्हां येणार गरीब आंबेगांवला ताई ?

**सुभाताई**:—बरें ग हें तुझें गरीब गांव–छान धिंडवडे काढीत होतें माझे...जन्माची आठवण राहील मला.

**आशा**:—येणार नाहीं वाटतें इकडे पुन्हा कधींच ?

**सुभाताई:**—येईन फक्त तुझ्या डोहाळ जेवणाला—

**आशा:**—डॉबल तुमचें–कशांत कांहीं नाहीं–नि आंबेगांव सोडून गेल्यानंतर.

---

# १३

आनंदरावांच्या नांवानें सुभाताईचें पहिलें वहिलें पत्र आलें होतें. त्यांत त्यांच्या सदाशिव पेठेंतल्या घराचा अर्धा हिस्सा त्यांना मिळाला असा कोर्टातर्फे झालेला निकाल त्यानीं कळवला होता. आणि विनाकराव सुद्गन येऊन ते आपल्या धाकट्या भावाकडे कांहीं दिवसांसाठीं गेले असून ते पुण्यास परत येतील. तेव्हां त्यांचा परिचय करून घेण्यासाठीं नि सुभाताईच्या खास घरच्या पाहुणचारासाठीं उभयतांनीं पुण्याला आलें पाहिजे असा त्यांत जिव्हाळ्याचा आग्रह फक्त केला होता.

आनंदरावांवर आलेल्या तोहमतीत त्यांचें वजन विशेष घटलें नाहीं हें हळूं हळूं त्यांना कळून आलें ! पूर्वीची त्यांची प्रतिष्ठा कायम असून पूर्वीइतकेच लोक त्यांना मानीत आहेत. तें प्रकरण जोंपर्यंत ताजें होतें तोपर्यंत लोक तें आठवूं शकले. आता ते इतिहासजमा झाल्याकारणानें तें मनांत ठेऊन किंवा उकरून काढून आठवीत बसण्याची जरूरी वाटण्यासारखें त्यांत कांहींच नव्हतें हें लोकांनीं पण ओळखून ठेवलें होतें.

झाल्या गोष्टी होऊन गेल्या. भय्यासाहेबांकडून कधींकाळीं त्यांना चहाचें बोलावणें येईल असें वाटतहि नव्हतें. तरीपण बिचाऱ्या सुशिलाबाईना कोंडल्यासारखें वाटत असावें नि त्यांची नि आपली भेट होऊं नये याचें त्यांना

वाईट वाटे. पण आपणहून त्यांना निरोप पाठवून आपल्या घरीं बोलावून घेणें त्यांच्या भावनेचा आणि हिताचा विचार करतां आशेला योग्य वाटलें नाहीं.

कशामुळें तें नकळे ! भय्यासाहेबांची आंबेगांवाहून बदली झाली असल्याचा तांतडीचा हुकूम त्यांना तारेनें मिळाल्याचें आनंदरावांना कळलें. आपली बदली अचानक झाल्यामुळें भय्यासाहेब संत्रस्त झाले होते. आपल्याविरुद्ध कोणी कसला अर्ज केला तर नाहीं ना अशी त्यांना जबर शंका आली होती. म्हणून ते आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना भेटण्यासाठीं ताबडतोब बाहेर गांवीं निघून गेले होते.

ती संक्रांत होती. तरीपण सुशिलाबाई आल्या नाहींत नि आशा पण त्यांना भेटण्यास गेली नाहीं. दुसऱ्या दिवशीं किंक्रांत असल्यामुळें भय्यासाहेबांचे सर्व पट्टेवाले दुपारपासून तो " सणाचा दिवस " म्हणून रजा काढून निघून गेले होते. ही संधी साधून भर दुपारींच सुशिलाबाई आशेला भेटण्यास आल्या होत्या. पाहतात तो तिला ताप भरून आला होता. आनंदराव तिच्याजवळ बसून कांहींसें वाचून दाखवीत होते.

**आनंदरावः**—या या—म्हटलें आमच्यावर रागवलां वाटतें !

**सुशिलाबाईः**—मी कशाला रागवूं ? तुम्हीं जाणतांच सारें ! बंदी झाली आहे मला घराबाहेर पडायला ! हिचा साधाच ताप आहे ना ?

**आनंदरावः**—मलेरिया आहे सकाळीं उतरतो.

**सुशिलाबाईः**—ताईचें आलें होतें कां पत्रबित्र ?

**आनंदरावः**—गेल्यापासून आले होतें त्यांचे खुशालीचे एक पत्र... तुमचें कसें काय चाललंय अलिकडे ?

**सुशिलाबाईः**—वा ठीक चाललंय् की माझें. त्यांच्यासाठीं दररोज निरनिराळें फराळाचें करून ठेवायचे ! रोज ब्रिज खेळायला येणाऱ्यासाठीं चहाचीं आधणें तयार ठेवायचीं ! दोनवेळचा स्वयंपाक करून आनंदानें त्यांना, मुलांना जेऊं घालायचें त्यांत मुलांचे होय नव्हे—सारें कांहीं ठीक चाललंय् ! आणखी काय हवें असतें गृहिणीला ?

**आनंदरावः**—असें कां ? प्रकृति बरी नाहीं वाटतें ?

**सुशिलाबाईः**—दोन पायांवर उभी आहें तोपर्यंत सर्व कामें केलीं पाहिजेत.

**आशाः**—पण सैंपाकीण कां ठेवीत नाहीं ?

**सुशिलाबाईः**—घरांत सैंपाकी असला म्हणजे स्त्रिया आळशी होतात. हें जसें त्यांचें मत आहे तसेंच माझें आहे असें आल्यागेल्यांना सांगावें लागतें मला. मी तिकडची बायको आहेंना ?

**आनंदराव**:—मला वाटतें भय्यासाहेबांकडे पाहण्याचा तुमचा दृष्टिकोन बराच कलुषित झालेला दिसतोय्. मी तर त्याला कारणी नाहीं ?

**सुशिलाबाई**:—भलतेंच कांहीं तरी !

**आनंदराव**:—तुम्हीं येथून जाणारच आहां. तत्पूर्वी मला एकदोन गोष्टी तुमच्या कानावर घालायचा माझा इरादा होता. राग तर नाहींना यायचा ?

**सुशिलाबाई**:—बोला म्हणजे मी तुमच्यावर खूप रागवेन—ओरडेन भांडेन सुद्धां—हं बोला !

आनंरावांना हसूं आंवरलें नाही.

भय्यासाहेबांच्या कांहींशा लहरी आत्मनिष्ठ दुटप्पी नि मत्सरी वागण्यामुळें सुशिलाबाई त्याना मनांतून दोष देत असणार ! ते एक मोठे अंमलदार असूनहि सर्वसाधारण माणसाप्रमाणें विवेकाचें सुद्धां वागणें त्यांच्याकडून होत नाहीं हें सुशिलाबाईच्या मनांत येत असणारच.

आनंदरावांनी तो विषय काढून त्यांना मानसशास्त्र दृष्टया ते सर्व कांहीं समजावून सांगू लागले. त्यांनीं अनेक लहान थोरांची उदाहरणें घेऊन मानव हा अनेक विध विसंगत वृत्तींचा कसा समन्वय आहे, कोणती वृत्ती कोणत्या वेळीं फोंफावून जोर करील याचा नेम नसतो, आनंदरावांची व्यक्त होणारी सत्प्रवृत्ति ही खरीखुरी आहे कीं तकलुफी आहे हें त्यांचे त्यांनाच सांगतां यायचें नाहीं, कोणत्या प्रसंगीं माणसाची अस्मिता तीव्रतेनें जागी होऊन स्वार्थ हाच त्याचा एकमेव हेतु बनेल हें अजमावतां यायचें नाहीं वगैरे गोष्टी त्यांनीं चर्चिल्या त्या दृष्टीनें त्यांना आपल्या पतीविषयीं इतकी अप्रीति वाट-

ण्याचें कारण नाहीं हे त्यांनीं सुशिलाबाईंना पटविलें. त्यांचा संसार—त्यांच्या मुलाबाळांचा संसार, सुखी व्हायचा असेल तर त्यांनीं आपल्या पतीवरचें प्रेम लवमात्र ढळूं देतां कामा नये, हें त्यांनीं त्यांना कांहींशा विस्तारानें विषद करून सांगितलें. मनुष्य कधींच देवत्व पावूं शकत नाहीं. निसर्गाचा नियमच अपूर्णत्वानें सिद्ध होतो. म्हणून ज्यांच्याशीं पती म्हणून वागायचें आहे त्यांच्या गुणसमुच्चयांकडे बघून पत्नीनें समाधान मानून घेण्यांत तिच्या जीविताचें कल्याण आहे. भय्यासाहेब हे तालुक्याचे अधिकारी आहेत. त्यांना सर्व लोक मानतात तसें आपणहि मानायला शिकून त्यांची आत्मनिष्ठा सुखविण्याचा यत्न केला पाहिजे. नव्हे तसे त्यांच्याशीं वागणें हें सुशिला-बाईंचे कर्तव्य ठरतें वगैरे अनेक विचार आनंदरावांनीं त्यांना सुनविलें.

**सुशिलाबाईः**—पण उघड उघड वैगुण्यें दिसत असतांना माणसानें आपले मन साफ कसें ठेवायचें ? कसें शक्य आहे ?

**आनंदरावः**—अशांची कींव करून आपलेंच वागणें वाजवी ठेवावें म्हणजे त्या वागण्याचा परिणाम केव्हां ना केव्हां त्यांच्यावर झाल्यावांचून राहणारच नाहीं !

सुशिलाबाई जरा वेळ स्तब्ध बसून राहिल्या.

**सुशिलाबाईः**—कण्व ऋषींचा आश्रम सोडून जाणाऱ्या शकुंतलेला जसा कण्वमुनींनी हितोपदेश केला तसा मी आंबेगांव सोडून जातांना तुम्ही करीत आहां हें मी विसरणार नाहीं.

**आशाः**—शकुंतला कण्वाची मानलेली मुलगी होती.

**सुशिलाबाईः**—मग मी यांची कोण ? तुम्हीच सांगा !

त्यांच्या या भाबड्या नि सरळ प्रश्नाचें उत्तर द्यायची जरूरी आनंद-रावांना वाटली नाहीं.

भय्यासाहेबांनीं खाजगी खटपट करूनहि त्यांची बदली कायम ठरली. ते आंबेगांव सोडून साताऱ्यास निघून गेल्यास एक महिना उलटून गेला होता.

**आशाः**—सुशिलाबाईंचा परस्परांच्या खुशालीचा पत्रव्यवहार चालू होता.

इतक्यांत एके दिवशीं सुभाताईंचे आनंदरावांना तांतडीचें पत्र आलें. त्यांनीं त्या उभयतां पतीपत्नीला ताबडतोब बोलावून गुरुवारीं दुपारीं पुण्यास हजर व्हा असा हुकूम फर्माविला होता—पकडवॉरंटच होतें तें ! !

---

# १४

ठरलेली मेल जशी ठरलेल्या वेळीं नेमकी स्टेशनांत घुसते. त्याप्रमाणें आशा आनंदराव सुभाताईंच्या घरांत शिरले. पाहतात तों त्या एकाद्या नव्या नवरीप्रमाणें सजून उभ्या असलेल्या त्यांनीं पाहिलें. या जोडप्याच्या स्वागतार्थ त्या हंसतच पुढें आल्या.

**सुभाताई**:—हे विनायकराव ! हे आनंदराव वैद्य–त्यांच्या सुशिल पत्नी सौ. आशावतीबाईसाहेब. बाकी सांगितलें आहेच परस्परांना...आनंदराव ! आज मी सौ. जोग व्हायचें निश्चित केलें आहे. कार्य समारंभ पार पाडण्यास श्रीसमर्थ आहेच...हे पहा आनंदराव ! तुम्हीं लेखक, कसे काय नि हजार प्रश्न तुम्हीं मला विचारूं लागणार असें दिसतेंय् ते आपण रात्रीं निवांत बोलूं. तोंपर्यंत स्नान उरकून घेऊन माडीवर तुम्हां दोघांसाठीं एक खोली तयार ठेवली आहे तींत जाऊन आराम करा ! जा बरं !

असें म्हणत सुभाताईंनीं त्यांच्याकडे पाठ फिरविली सुद्धां. त्यांचें लग्न वेळेवर उरकलें. रात्रीचीं सुग्रास जेवणें होऊन पाहुणे सुस्त पडले होते. त्यांतल्यात्यांत वेळ काढून सुभाताई विनायकरावांसह आनंदरावांच्या समाचारासाठीं आल्या.

**आशाः**—बोले तैसा चाले, त्याचा वंदावीं पाऊलें.

**सुभाताई**ः—घाला तर नमस्कार बघूं !

**आनंदरावः**—म्हणजे तुम्हांला खरें वाटलें कीं काय ?

मुंबईंत गोरेगांवकरांच्या चाळींत असल्यापासून सुभाताईंचें प्रेम विनायकरावांवर जडलें होतें. त्याचवेळीं त्यांचा विवाह झाला असता पण सुभाताईंच्या शांतीचें लग्न व्हायला अडचणी उत्पन्न होतील या कल्पनेनें त्यांनीं आपला निश्चय लांबणीवर टाकला. मध्यंतरी हा भलताच प्रकार घडला नि विनायकरावांना तुरुंगवास घडला.

**आनंदरावः**—खरी काय हकीकत आहे विनायकराव ?

**सुभाताई**ः— सांगा ना–हरकत नाहीं !

**विनायकराव**ः—चंद्राचा नवरा दारु प्यायला होता. तो शुद्धींत नव्हता. ती त्याच्याबरोबर जायला तयार नव्हती नि जायचें म्हटलें तरी तो कुठें नेणार होता ? त्याला ना घरदार–अर्थात् तिनें तें नाकारलें. त्यावेळीं बेभानपणें " भावाशीं संसार करतेस × × × " असें बोलूं नये तें बोलून गेला. आपल्या नशिबाला दोष देत सदाची चिडकी बनलेली चंद्रा संतापली, तिने तेथील धोपटणें उचललें नि मी तिला धरण्याच्या आंत तिनें त्याच्या टाळक्यांत सटकलें. तो जो पडला तो उठलाच नाहीं. जणूं मरायला त्याला निमित्त हवें होतें...तें सारें मी माझ्यावर घेतलें...

**आशा**ः—बऱ्याच आंतल्या गांठीच्या आहां ताई तुम्हीं–दाद लागूं दिली नाहींस या अर्जुनांची !

**सुभाताई**ः—चाळीतली सुभद्रा मी ! आमचें काय विशेष असायचें ?

**आशा**ः—पुढें करणार कीं काय नोकरी ?

**सुभाताई**ः—होय. यांची करणार आहें ! अगदीं मनोभावानें करणार आहे राहिले किती दिवस आमचे ? मिळेल तो आनंद माणसानें भोगलाच पाहिजे ना ? तुमचेंच ध्येय आहेना तें !

**विनायकरावः**—माणुसकीनें वागून परस्परांच्या सहवासांत सुख मानून जगणें हीच जीवनाची एकमेव आनंदाची शीतल छाया आहे.

**सुभाताई**:—तशी माणुसकी आनंदरावांच्यापाशीं भरपूर आहे हं ! नि त्यामुळें आबेगांवांत त्यांच्याविषयीं नाहीं नाहीं तें उठविलें होतें लोकांनीं !

**आशा**:—कशाला त्या दुष्ट आठवणी ?

**विनायकराव**:—समंजस स्त्री पुरुष एकत्र येतात, त्याचा योग्य अर्थ लावण्याची पात्रता नसते सामान्य लोकांत...नि मत्सर ही प्रमुख बाब असते असल्या लोकापवादांच्या मुळाशीं !

**आनंदराव**:—पण त्या लोकांचे संस्कार उच्च दर्जाचे असतात असें तर नाहीं म्हणायचे तुम्हांला ?

**विनायकराव**:—इतक्या कडवटतेनें वागून जगाला तुम्हीं ठोकरा दिल्यात कीं तें जग तुमच्यासाठीं खड्डे खणीत राहते.

**आशा**:—पण आपल्या हिंदुसमाजातच कां अशी हीन वृत्ति आढळते ? स्त्रीपुरुषांची मैत्री अमंगल का आहे ? असे सहवासप्रिय स्त्रीपुरुष परस्परांशीं वागतांना आपलीं मनें, भावना, हृदयें काय खुंटीवर टांगून ठेवून वावरतात? केवळ दोन पाय नि धड घेऊनच कां तीं माणसें फिरत असतात ? त्या शरिराच्या आंत त्यांच्या माणुसकीला शोभा देणारें असें कांहींच कां नसतें त्यांच्यापाशीं ? नि इतकी का स्वस्त असतात स्त्रीपुरुष ?

**विनायकराव**:—आम्हां लोकांची ती चूक आहे. पूर्वी हिंदु धर्माचे अधिष्ठान त्यागावर होतें. म्हणून स्त्री-पुरुष यांच्यातील निसर्ग भेदांकडे पाहूनच समाजानें प्रतिबंध जारी केले. तो काळ पार बदलला ! पण आपली दृष्टि निवळली नाहीं. निसर्गाच्या मंगल कार्याचें आम्हीं जेवढें आजपर्यंत विडंबन केलेंय् तितकें कोणाहि परधर्मीयानें केलें नाहीं.

**सुभाताई**:—पण भय्यासाहेब कांहीं अशिक्षित सामान्य गृहस्थ नव्हते !

**आनंदराव**:—त्याचें कारण मी सांगतों. तुम्हां तिघी जणींशीं वागतांना त्यांचा मत्सर जागा झाला. मला चारित्र्यहीन ठरविलें म्हणजे आपोआप आपण मोठे ठरतो असा कयास बांधून तें प्रकरण त्यांनीं पेटविलें...आपल्या पत्नीवर आपलें वजन राखण्यासाठीं ही सारी धडपड होती त्यांची !

**सुभाताई**:—सुशिलाबाई आज आल्या असत्या तर दुधांत साखर पडली असती...पण हें भय्यासाहेबांना पटायला हवें !

**आशा**:—भय्यासाहेब ! दिसायला किती नम्र–बोलायला किती लाघवी–पण कमाल आहे हं त्यांची !

**आनंदराव**:—पावसाळ्यांत भर पाण्यानें वाहणारे नाले पाऊस संपला कीं रोडावतात–नि उन्हाळ्यांत त्या नाल्यांतील रूक्ष दगड–खडकाळ कातळ दिसतात–पाहवत नाहीं तें दृश्य...पण पुन्हा पावसाळा आला कीं तोच खडकाळ मार्ग असतो पाण्याचा खळाळून वाहण्याचा !

**सुभाताई**:—पुरे की कविराज !

**विनायकराव**:—उद्यां आहेतच कीं हे...बोलूं हवे तेवढे !

**आनंदराव**:—कशाला त्रास घेतां ? इथंच पथाऱ्या पसरायला सांगा तुमच्या रामाला—बसूं बोलत झोपा लागेपर्यंत–आमची हरकत नाहीं.

**सुभाताई**:—पण माझी आहेना !

आनंदराव ओठांतल्या ओठांत हंसत असल्याचें पाहूनच सुभाताईंनीं उत्तर दिलें...पण त्या जराशा लाजल्याच ! तेथें विनायकराव होते हें त्या विसरल्या होत्या–एक क्षणभरच !

**सुभाताई**:—कारण या रोग्याकडे पाहिलें पाहिजे–ना ? किती वाईट झालेय् आशा...नीज बाई लौकर...नाहींतर उद्यां तापानें पडून राहिलीस तर...

**आनंदराव**:—नर्सला शोधायला जायला नको—!

**सुभाताई**:—आवेगांवांत मी आहें असें समजून आशेच्या शुश्रूषेला येण्यास एका पायावर तयार आहें.

---

# १५

घरीं जडलेला आशेचा मलेरिया, तिची पाठ सोडीना. पुण्यास सुभाताईच्या लग्नासाठीं आल्यापासून आनंदरावांनीं पुण्यांसच आपला मुक्काम ठोकला होता. तेथील एक होमिओपॅथिक डॉक्टरांचे औषधोपचार आशेला चालू होते. तिला तात्पुरता गुण आला होता. म्हणून आणखी एक आठवडा ते पुण्यासच राहणार होते.

इतक्या अवकाशात विनायकरावांचें नि आनंदरावांचें चांगलेंच मेतकूट जमलें. विनायकराव चाळीशी उलटून गेले होते तरी त्यांचे विचार ताजे, काळाला अनुरूप होते. नव्हे आपल्या कल्पनाशक्तीनें ते भविष्यकालांत नजर टाकून त्याप्रमाणें विचार करण्याची संवय आपल्या मनाला त्यांनीं लावून घेतली असल्याचें आनंदरावांना समजून आलें होतें. त्यामुळें त्यांची वृत्ति अगदीं एकाद्या नवजवानाप्रमाणें तल्लख होती. आशावादी, खिलाडू होती ! जीवनाकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोन सुदृढ होता. त्यांचा मानवी समंजसपणा विशाल होता. अर्थात् तरुण आनंदरावांशीं त्यांची मैत्री जमण्यास मुळींच वेळ लागला नाहीं.

आशा जरी दर दोन दिवसानीं बिछान्याला खिळून राही तरी आंबेगांवाला असतांना तिनें आनंदरावांच्या वागण्यांत कांहीं तरी फरक पडत असल्याचें ओळखलें होतें...

आणि तो फरक तीं उभयतां पुण्यास आल्यापासून तिनें पूर्णपणें पाहिला होता. त्यांना दोनतीनदां त्याविषयीं तिनें विचारून पाहिलें. " पण कुठें काय ? कांहीं नाहीं " असें म्हणून आशेच्या प्रश्नाला आनंदरावांनीं बगल दिली होती...

ते आज आपल्या एका लेखक मित्राला भेटायला गेले होते. नि उलट तो त्यांचा मित्र त्याना सुभाताईच्या घरीं भेटण्यास आला होता. चहा वगैरे

झाल्यानंतर ते दोघेजण फिरायला म्हणून बाहेर पडले ते रात्रीं नऊ वाजून गेले होते तरी परत आले नाहींत. अर्थात् या तिघांना त्यांची काळजी वाटूं लागली होती.

आनंदराव उशिरां कां होईना, एकदांचे आले. निमूटपणें जेवले नि ओटीवर टाकलेल्या आरामखुर्चीवर पडून राहिले. त्यादिवशीं आशेला ताप आला नव्हता. त्यामुळें सुभाताई आशा–विनायकरावांसह तेथें उपस्थित झाल्या.

आनंदराव आज विचारलेल्या प्रश्नांचीं नेमकीच उत्तरें देऊन स्वस्थ बसूं पहात होते. त्यांच्या बोलण्यांतील मोकळेपणा नि आर्जव पार निघून गेलें होतें.

त्या तिघांचें तसेंच कांहींतरी बोलणें चालूं होतें. पण त्या बोलण्याला रंग भरेना....त्यांतील औपचारिकपणा सर्वांनाच भासूं लागला.

**विनायकराव**—काय झालं तरी काय तुम्हाला ?

**आशा**ः—बोलाल तर कळेल तरी आम्हाला. कुढायचें किती ?

**सुभाताई**ः—कुढेनात कुढले तर–सांगतील आपोआप सारें कांहीं ? केव्हां तरी !

**आनंदराव**ः—केव्हां तरी कशाला आतांच सांगतो. उगाच आडपडदा कशाला ?

**सुभाताई**ः—पण नमनाला घडाभर तेल जळून गेलें ना !

**आशा**ः—मला बाई काळजी वाटतेय्. मी तर चुकलें नाहीं ना कांहीं ? सांगाना काय तें लौकर !

**आनंदराव**ः—आंबेगावांतील त्या शहाणेबाई प्रकरणापासून खरें म्हटलें तर कधीं चैन पडलें नाहीं मला...आपण विनाकारण त्यांत गोविले गेलों असलों तरी असा आमच्यावर आरोप येऊन तो नाशाबित करीत बसायला लागावें यांत आपलें कुठें तरी चुकत असावें असें मला मनोमन वाटत होतें... पण तें काय तें समजलें नव्हतें मला—

**आशा**ः—पण लोकांच्या तोंडाला कोण हात लावणार ?

**आनंदराव**:—आत्मवंचना आहे ही—लोकांनीं तरी आपलेंच नांव कां घ्यावें ?

**सुभाताई**:—कुणाचें तरी घेतलें जाणारच होतें...तुमचा माझा परिचय—आशा आपल्या हस्ताक्षरानें त्यांत गुंतून गेलेली म्हणून तुमचें नांव पुढें आलें—!

**आनंदराव**—तें निमित्त झालें, पण तें घेतांना आपलें पूर्वीचें जीवन, चारिच्य लोकांनीं ध्यानीं आणून आपल्यावर तसा आरोप करणें गैर आहे याचा विचार त्यांना कां सुचला नाहीं ? तो त्यांना करावासा वाटला नाहीं यांतच आपलें चुकतेंय् कुठें तरी...

**विनायकराव**:—हें फार गूढ बोलत आहां...तुमच्या चारिच्याची थोरवी लोकांनीं ओळखावी इतकें प्रभावी जीवन तुम्हांला घालवितां आलें नाहीं असेंच ना तुम्हांला म्हणायचंय् ?

**आनंदराव**:—अगदीं बरोबर आहे विनायकराव...नि निदान यापुढें आपलें जीवन ज्यास्त प्रभावी कसें होईल याचाच विचार माझ्या मनाला त्रास देत आहे. कारण त्या प्रकरणात ज्या यातना भोगल्या आहेत त्यानें मी खूप शिकून नि शेकून निघालोंय्.

**आशा**:—असं काय एवढें शिकलां तुम्हीं ?

**सुभाताई**:—कसले शिकताहेत ? तोंडच्या वाफा आहेत या !

**आनंदराव**:—लोकांत मिसळून त्याची सेवा करीत राहणें हेंच आपलें जीवन यशस्वी करण्याचें महान् विद्यापीठ होय. त्यांत जे अनुभव मिळतात, त्या माणसांना यशोगिरीकडे नेणाऱ्या पायऱ्या ठरतात...जो मनुष्य लोक-सेवेच्या प्रत्यक्ष मार्गाबाहेर राहतो, लोकांत येऊन मिसळत नाहीं त्याच्या हातून कांहीं व्हायचें तर नाहीं...पण त्याची व्यक्तिगत उन्नति पण खुंटून जाईल.

**सुभाताई**:—तुम्हीं लेक्चरें छान देतां हे मला माहीत आहे आनंद-राव ! पण हें करणार कसें काय तुम्हीं ? ·तुमच्या सुखाच्या, आनंदोत्पत्तीच्या कल्पना मला माहीत आहेत.

**आनंदराव**:—आपलें जीवन हे आनंदानें जगण्यासाठीं आहे. दुसऱ्या कोणाच्या आड येणार नाहीं अशा सुखभोगांवर आपला निसर्गसिद्ध हक्क आहे.

आल्या परिस्थितींत आनंद मानून—नव्हे तो उत्पन्न करून मनाला उल्हसित ठेवावें. सतत आनंदी रहावें ही कष्टसाध्य—पूर्व संस्कारमय कला आहे. मनुष्य कितीहि पदवीधर असला तरी त्याला जर ही सूक्ष्म दृष्टि नसेल तर तसें जगणें त्याला साधणार नाहीं—कारण ती आनंदीवृत्ति रक्तारक्तांत मुरावी लागते—शरीरांतून ती उत्क्रांत व्हावी लागते.

**सुभाताई**:—बरं—मग ?

**विनायकराव**:—बोलूं द्या त्यांना पुढें...

**आनंदराव**:—या आनंदी जीवनाचा विचार मी अजूनपर्यंत व्यक्ति निष्ठ-तेनें आत्मीयतेनें–किंबहुना स्वार्थी वृत्तीनें केला. मी माझ्याच आनंद निर्मितिसाठीं जगलों–ती साध्य व्हावी म्हणून झगडलों...पण तसेंच इतरांना जगायचें असतें–त्यांचाहि सुखावर तितकाच हक्क असतो हें आपण कधीं मान्य केलें होते कां ? त्या बिचाऱ्यांना आपल्या हक्काचें सुख मिळत नाहीं–मिळवितां येत नाहीं–म्हणून तें त्यांना मिळवून द्यावें असें वाटून आपल्या सुखी जीवनाला गौण स्थान देऊन त्यांची वकीली स्वीकारून त्यांच्यासाठीं झगडावें असें कधीं आपल्या मनांत आलें होतें का ?

**विनायकराव**:—नाहीं–बरं मग ?

विनायकराव आनंदरावांच्या विचारांचा उफाळून येणारा ओघ ऐकत बसले होते. त्यांना त्यांत जिज्ञासा वाटूं लागली...आनंदराव जरी कांहीं नवीन सांगत नव्हते, तरी त्यांची विचारसरणी योग्य मार्गावरून प्रवास करीत आहे याची त्यांना खात्री वाटली...

**आनंदराव**:—मी त्याच गोष्टीचा विचार करीत आलोंय् महिनाभर—पहा बरोबर वाटतंय् कीं काय तें तुम्हाला !—

**विनायकराव**:—बोला ना...

सुशिक्षित मनुष्य आपल्यापुरतेंच एक लहानसें काल्पनिक जग तयार करतो ! प्रेमळ पत्नीशीं लग्न करून आपलें कुटुंब म्हणजे एक बारिकसें वर्तुळ तो त्यांतच तयार करतो...आनंदरावांसारख्यांच्या बाबतींत वाचन लेखन–नि मनन...हीं आनंदोत्पत्तीचीं साधनें होतीं. आपल्या कुटुंबीय प्रिय माणांच्या

सहवासांतून जो वेळ मिळतो तो अशा रीतीनें घालविल्यास, लोकांशीं मिसळ-ण्यास यांना कधीं वेळ मिळणार ? अर्थात् ते समाजापासून—ते व्यक्तिशः कितीहि बुद्धिमान–निरुपद्रवी–चारित्र्यशील, किंबहुना उपकारशील असले तरी–दुरावतात हें सत्य कबूल केलें म्हणजे लोकांनीं त्यांच्याविषयीं आपुलकी कां दाखवावी हा प्रश्न उत्पन्न होतोच...आनंदरावांवर संकट आलें असतांना त्यांना मदत करण्यापेक्षां त्यांची गंमत पहात बसण्याची लोकांची उपेक्षा बुद्धि यांतूनच निर्माण झाली आहे...अनायासानें झालें तेवढें कधींकाळीं लोकांचें तुटपुंजें हित आनंदरावांनीं केलें असेल...पण ज्या एका हिरिरीनें त्यांनीं सुभा-ताईंना पाठिंबा देऊन आपल्या मित्रत्वाला जागले त्याच तळमळीनें ते जनतेंतील किती लोकांशीं वागले ? नुसते आपणांस आवडलेल्या पसंत पडलेल्या आपल्या स्वभावाशीं जुळणाऱ्या निवडक व्यक्तींचीच मैत्री आपण संपादतों. बाकीच्या आपल्या आजूबाजूंच्या लोकांचें काय ? ते आमच्या बुद्धीच्या वृत्तीच्या संस्का-रांच्या पातळीवर येऊं शकत नाहींत म्हणून ते तुमच्या मित्रत्वाला, संरक्षणाला कसे मुकतात ?

**आनंदराव**:—आपल्या मित्रांचे वर्तुळ मोठें करणें–आणखी मोठें करणें–तरीहि मोठें करणें यांतच त्या व्यक्तीच्या जीवनाचा विकास आहे असं मला वाटूं लागलंय्. पटलंय् ! म्हणून मी लोकांचा, भोंवतालच्या जनतेचा–तुम्हा सर्वांचा आहे तसा मित्र होऊं इच्छितों...पण तें कसें तें मला समजत नव्हतें–समजलें नव्हते.

**आशाः**—तें कसें काय ?

**आनंदरावः**—लोकांचें दारिद्र्य वाढत चाललंय्. जगांत जगण्यास लागणारी त्यांची शक्ति नाहींशी होत चाललेय्–मानवाच्या मनांत उपजत असलेली प्रतिकार वृत्ति, झगडण्याची हिरीरी, अगदींच मंद होऊन शेवटच्या पायरीच्या टोंकाला येऊन बसलीय्–त्यांच्या मनाला, विचाराना...आणि इतर आकांक्षाना वाव देण्यासारखी भूमिका नसल्यामुळें, आपापसांतील तेढ–झगडे–स्वार्थ, वाढून तेंच त्यांचे जीवन होऊन राहिलें असल्यामुळें, समाजांत बारीक बारीक असे हजारों थर बनून राहिले आहेत. त्यांच्या वाया चाललेल्या

बुद्धीचा, शक्तीचा उपयोग कांहींतरी भरीव कार्याला लावायला पाहिजे...म्हणून यच्चावत सर्व लोकांना पाहिजे असलेलें स्वातंत्र्य मिळविण्याच्या भूमिकेवर लोकांना एकत्र आणलें पाहिजे...स्वातंत्र्य मिळाले—म्हणजे उत्पादन वाढेल—बेकारी जाईल—सुखसोई वाढतील—हळूं हळूं सर्वांना सुख मिळेल अशी परिस्थिति होईल. अतएव मामुली स्वार्थाला—हेव्यादाव्यांना वाव मिळणार नाहीं—हळूं हळूं जनतेची दृष्टि शिक्षणानें—प्रचारानें विस्तृत होत जाईल; समंजस...सहिष्णु बनत जाईल...आणि मग समाजांत बारीक बारीक संघर्ष उत्पन्न व्हायचे थांबतील.

**विनायकराव:**—हें रामराज्य केव्हां यायचंय् ?

**आनंदराव:**—केव्हां येईल हा विचार करीत त्यासाठी झगडायचं नाहीं ही माणुसकी नव्हे—बुद्धीला पटल्यानंतर—नुसता विचार करीत बसण्यानें निष्क्रीयता येते...कांहींतरी कृति ही केलीच पाहिजे म्हणून...म्हणून...

**आशा:**—म्हणून लोकांत मिसळलें पाहिजे—

**आनंदराव:**—नुसतें मिसळून चालायचें नाहीं. त्यांचा मित्र बनून जायला पाहिजे. आतांच सांगितले कीं जनतेंतील छोट्या छोट्या वर्गातील क्षुल्लक कारणांकरतां लढे सतत चालतात. त्यांच्या शक्तीचा अपव्यय मोठ्या प्रमाणावर चालत असतो—त्यामुळें आपापसांत फूट पडत जाते—दुही वाढते अर्थात्‌च त्या जोरावर परकीय सरकार येथें आपणांवर राज्य करतें...

**सुभाताई:**—हें सर्व लोकांना कसें पटवणार ?

**आनंदराव:**—त्यासाठीं एक वर्तमानपत्र काढावेंसें मनांत येत होतें. तो बेत मी आज निश्चित केला....माझ्या लेखनशक्तीचा असा सुदुपयोग करून जें कांहीं लोकहित साधेल तें साधण्याचा यत्न करण्याचा निश्चय करून मी घरीं परतलोंय्.

**सुभाताई:**—पण तुम्ही लोकांचे मित्र व्हायचं बोलत होतां. शिक्षक व्हायचं नव्हे.

**आनंदराव:**—लोकांचीं सुखदुःखें—लोकांवर होणारे अन्याय वेशीवर टांकण्यासाठीं वृत्तपत्र हेंच प्रभावी साधन आहे. लोकांच्या गाऱ्हाण्यांची दाद

लौकर लागावी म्हणून वृत्तपत्रच उपयोगी पडतें. अशा रीतीनें लोकांच्या कल्याणासाठीं चाललेलें पत्र पाहून लोकांची माझ्याकडे बघण्याची वृत्ति निवळेल आणि हळु हळू त्यांच्याशीं एकजीव होऊन त्यांचीं सुखदुःखें तीं आपलीं मानून मला वागता येईल...नि मला लोकांपाशीं प्रवेश मिळविण्यासाठीं वृत्तपत्रच उपयोगी पडेल. अर्थात् त्यांचा मी मित्र म्हणून विश्वास संपादन केल्यावर आणखी काय पाहिजे ? नि तें साधलें म्हणजे लोकांच्या लढाऊ वृत्तीचा उपयोग करून घेण्यासाठीं त्यांच्यापुढें स्वातंत्र्य प्राप्तीचें—क्रांतीचें एकमेव ध्येय ठेवणें, त्यांना त्यासाठीं कार्यप्रवृत्त करणें सोपें जाईल, असें मला वाटतें.

**आशाः**—नि असे करतांना सरकारी रोषाला बळी पडावें लागेल तें !

**आनंदरावः**—तो अनुभव सर्वच लहानमोठ्यांचा आहे ! भिऊन कसें चालेल ?

**आशाः**—बाई ! माझं कसं होईल ?

**सुभाताईः**—इतर लोकांचे जसें होईल तसें तुझें ! तूं त्यांची पत्नी म्हणून तुझ्यासाठीं राखीव असें प्रेम उरणार नाहीं बरं का यापुढें आनंदरावांपाशीं—ते आतां जनतेचे होणार आहेत. जनता त्यांची होणार आहे !

**विनायकरावः**—कठीण मार्ग आहे हा आनंदराव...पण तुम्हांला माझी मदत लागली तर आनंदानें देईन मी.

**सुभाताईः**—अय्या ! मग लग्न कशाला केलंत्—बरें होतां, होतात तसे !

**विनायकरावः**—आनंदरावांचे मित्र म्हणवून घ्यायला आपणास जागा नको का ?

आनंदरावांना त्या रात्रीं झोंप लागेना. त्यांच्या मनांत अनेक विचार येऊन जात होते. ते त्या एका गोष्टीचा हजार बाजूंनीं विचार करीत असताना या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होते.

आशा निजली नव्हती. तीहि विचार करीत एका कुशीवर पडून राहिली होती...तिला अखेरीस राहवलें नाहीं.

**आशाः**—मी एक सांगू का...

**आनंदरावः**—झोपली नव्हतीस...? कायतें बोल ना !

**आशाः**—आपणांस पैशांची मदत लागेल, नाहीं ?

**आनंदरावः**—बरं, मग ?

**आशाः**—माझे दागिने आहेत ते......

---

# १६

हिंवाळा येतो...कडकहि होतो...त्याप्रमाणांत हिमालयावर बर्फाचा खच पडत असतो—पण हिंवाळ्यानंतर उन्हाळ्याचा कडाका येतोच. त्या उन्हाच्या तप्ततेनें तें सांचलेले बर्फाचे कडे नि डोंगर पार वितळून जातात...या प्रक्रियेने हिमालयाच्या आसपास राहणाऱ्या जनतेचें काय हित होईल तें होवो...पण गंगा–सिंधू–ब्रह्मपुत्रा या नद्यांना उन्हाळ्यांतहि पूर येऊन कांठाच्या दोन्हीं तर्फा भरून पाणी वहात असतें–नि त्यामुळें त्या त्या प्रांतांतील जनतेला उन्हाळ्यांतहि शीतल पाणी मिळतें त्यानें बागाईती फुलतात–पिकें उत्पन्न होतात–नि सर्व प्राणीमात्रांची तृषा पण तृप्त होते.

आनंदरावांवर आलेल्या प्रसंगांतून त्याचें मन बाहेर पडतांना अशा कांहींशा प्रकारचा त्यांच्यावर परिणाम होईल हें कल्पनेबाहेरचें वाटण्यासारखें झालें...त्यांना आपल्या जीवनांत आतां नवीन जोम, उत्साह वाटूं लागला. पूर्वी अज्ञ, अशिक्षित, गरीब जनतेची ते कींव करीत असत...आतां ती जनता अज्ञ अशिक्षित नि गरीब राहिली हा त्यांचा दोष नसून राज्यकर्त्यांचा—नि

तज्जन्य परिस्थितीचा दोष हें त्यांना समजलें—शिवाय सुशिक्षित सुज्ञ वर्गांनीं तिला सुधारण्याचा प्रयत्न न केल्यामुळें तो दोष कांहींसा पांढरपेशा लोकांचा होय असें त्यांना वाटूं लागले. गरीब जनतेचा राग करण्यापेक्षां, त्यांना कळत नाहीं म्हणून "गाढव" म्हणण्यापेक्षां ज्या कांहीं शिव्या द्यायच्या असतील त्या आपण आपल्यालाच मोजून घ्याव्यात हेंच आपल्या अद्यावत पापक्षालनाचें परिमार्जन ठरेल हें त्यांना मनोमय पटलें...

त्यासाठीं या सर्वसाधारण अज्ञानी, असंस्कारी लोकांवर, वेळेला दया दाखवूनहि भागत नसतें. दया दाखवणाऱ्या माणसाचीं साधनें आणि परिस्थिति संपन्न कितीहि असली तरी त्यांच्या मर्यादा ठरलेल्या असतात्, त्या मर्यादेबाहेर तो दयाळू सद्गृहस्थ जाऊं शकत नाहीं नि मग ज्यांच्यावर तो दया दाखविण्यास असमर्थ ठरतो त्या लोकांत त्याच्याविषयीं गैरसमज होणें अपरिहार्य ठरतें.

त्यासाठीं जो कांहीं प्रयत्न करायचा असेल तो मोठा नि मूलग्राही असावा याची आनंदरावांना खात्री पटली होती–नि त्यांनीं शोधलेला उपाय कितपत यशस्वी होईल याचा मनाशीं ते विचार करून अंदाज–अडाखे बांधीत होते...

पण म्हणतात ना..."छिद्रेष्वनर्था बहुलीभवंति." अडचणी त्यांची पाठ सोडीतात. आशेला इतके दिवस पुण्यास राहूनहि वाटावें तसें बरें वाटत नव्हते...तिच्या मलेरियाचें निर्मूलन झालें नाहीं...म्हणून ते आपल्या कल्पना आणि बेतबातासह तिला घेऊन कांहीं दिवसासाठीं हवापालट व्हावा म्हणून धौम महाबळेश्वरास येऊन राहिले.

आपलें वृत्तपत्र काढण्यासाठीं खरेदी करावयाच्या मुद्रण यंत्राबाबत त्यांचा पत्र व्यवहार चालू होता. आणि पुण्यास किंवा मुंबईस जें कांहीं त्या बाबत मामुली करावयाचें होतें तें विनायकरावांनी आपल्या अंगावर घेतलें. अर्थात् आशेला बरें वाटतांच ते आंबेगांवला जाऊन नंतर छापखाना खरेदी करून आणण्याचें त्यांनीं निश्चित करून टाकलेंच होते.

आशेला तेथची थंड नि उत्साहक हवा चांगली मानवली होती. तेथें आल्यापासून तिला ताप कसा तो मुळींच आला नाहीं...आलेली अशक्तता जावी म्हणून त्यांनीं तेथे एक महिनाभर राह्यचें ठरविलें. नि त्याप्रमाणें त्यांना तेथें येऊन पाऊण महिना लोटूनहि गेला होता—

एके दिवशीं दोन प्रहरीं एक कृश नि मध्यम उंचीची बाई आनंदरावांच्या तेथच्या बिऱ्हाडीं येऊन उभी राहिली...त्यांच्या बिऱ्हाडाचा दरवाजा उघडाच होता त्यामुळें ती स्त्री सरळ-निःसंकोचपणानें आंत शिरली.

**स्त्रीः**—अय्या—लक्ष नाहीं वाटतें ? सारखें वाचन कसलं चाललेंय्—?

**आनंदरावः**—कोण...तुम्ही, नि इथें कशा ?

**स्त्रीः**—ओळखलें कीं नाहीं मला—?

**आनंदरावः**—वा ? सुशिलाबाई ! तुम्हाला मी ओळखणार नाहीं असें कधीं तरी होईल ? बाकी बराच फरक पडलाय् तुमच्यांत इतक्या थोड्या अवधींत !

**सुशिलाबाई**—होय ना ! पण आशा कुठे आहे ?

**आनंदरावः**—तिचा आतांच डोळा लागला असवा. म्हणून मी इथें वाचीत पडलों होतों...तो हा अलभ्य लाभ झाला—

**सुशिलाबाईः**—मलाच अलभ्य लाभ घडला. खरें म्हटलें तर—

**आनंदरावः**—पण इकडे कुठें ?

**सुशिलाबाईः**—आलेंय् तुमच्याकडे पाहुणी—चालेल ना ?

**आनंदरावः**—थांबा—तर मग पाय धुवायला गरम पाणी आणतों... या आंत, आंत या, आशेला उठवितों.

सुशिलाबाई आंत गेल्या. आशा उठून बसली—त्यांना पाहून तिला आश्चर्य वाटलें. नि अत्यानंदहि झाला—

**सुशिलाबाईः**—अजूनहि आशेचे डोळे चमकदार दिसत आहेत आनंदराव. मलेरीयानें तिचें कांहींसुद्धां चोरलें नाहीं...

**आशाः**—नि तुमच्या आंगावरील बाळशाची कुणी केली चोरी......?

**सुशिलाबाई**:—आजारी होतें दोन महिन्यापूर्वी...जुळें झालें होते पण नशिबाने—

**आशा**:—अयाईऽऽऽ...

**सुशिलाबाई**:—बरें झालें एकदाचें ! त्या व्यापांतून सुटलें...बरं आपले पुढच्या वेळेपर्यंत तीन एकें तीन हा धडा घोकीत बसायला...

**आशा**:—फारच कावलेल्या दिसतां तुम्ही !

सुशिलाबाई आपल्या वृद्ध आईला घेऊन तीर्थयात्रेसाठीं कालच धौम महाबळेश्वरास आल्या होत्या. त्यांच्या आईला आपल्या कन्येशिवाय दुसरें कोणी जवळचे आप्त नव्हते म्हणून सुशिलाबाईंना आईच्या इच्छेसाठीं बरोबर यावे लागलें...त्यांचा गोकर्ण, वांई वगैरेचा प्रवास आटोपून त्या महाबळेश्वरास आल्या होत्या. भय्यासाहेब रजा काढून साताऱ्याहून त्यांना महाबळेश्वरास येऊन भेटणार होते. तेथून त्यांना बरोबर घेऊन पुढें हरेश्वरचें क्षेत्रदर्शन घडवून नंतर पुण्यास जाऊन सुशिलाबाईंना घेऊन साताऱ्यास परतणार होते... तोंवर येथें भय्यासाहेबांच्या ओळखीच्या एका बडव्याकडे त्यांचा मुक्काम पडला होता...तेथें सुशिलाबाईंना आशा आनंदराव तेथेंच असल्याचें दहा मिनिटा-पूर्वी कळलें—म्हणून त्या तशाच त्यांना भेटण्यांस आल्या.

**सुशिलाबाई**:—तूं येथें आली असशीलशी कल्पना नव्हती मला...बरं झालें. अचानकपणें आपली भेट झाली...किती आनंद वाटला म्हणून सांगूं तुला आशा...खरंच !

सुशिलाबाईच्या आनंदाची कळी बरीचशी फुलली, ती पूर्वीच्या मोकळे-पणानें बोलत होती...आनंदराव तेथून आंत निघून गेले.

त्या मैत्रीणींच्या गप्पा होताहेत तों त्यांनीं तीन कप चहा बनवून आणला. महाबळेश्वरास दुपारचा चहा तेच करीत असत.

**सुशिलाबाई**:—हें हो काय ? तुम्ही अगदीं ताळ सोडलांत ?

**आनंदराव**:—मग काय पाहुण्याला कामाला लावावयाचें ?

**सुशिलाबाई**:—जा गडे ! तुम्ही मला पाहुणी समजतां ?

**आशा**:—बरं तर जातां जातां तुम्ही करून पाजा आम्हाला. बरेच

दिवसांत तशी रूचि आली नाहीं तोंडाला आमच्या......

त्या तिघांचा चहा सुरू झाला.

**आनंदरावः**—भय्यासाहेबांच्या मनांत आतां तरी कांहीं राहिलें नाही ना ?

**सुशिलाबाईः**—असेल तर कशाला बोलून दाखवितील ते ?

**आशाः**—पगारबिगार वाढला कीं नाहीं ?

**सुशिलाबाईः**—मला माहीत नाहीं. ते कधींच या गोष्टी बोलत नाहीत आपल्या घरांत...नि पैशानेंच सर्व कांहीं मिळतें वाटतें ? खरें सांगूं आनंदराव ? तुम्हीं फेर्कात असलेला आनंद, उत्साह त्यानंतर मला कुठेंच मिळाला नाहीं. आढळलासुद्धा नाहीं,

पुन्हा तीं तिघेजणं शांत होतीं.

**सुशिलाबाईः**—मुलांचा तरी काय दोष ? एका अधिकाऱ्यांचीं मुलें म्हणून त्यांची जी कांही काळजी घ्यायला पाहिजे ती प्रेमानें घेत असतें मी ! त्यांत तिकडचा खाण्यापिण्याचा हव्यास ! दमलें बाई त्यांच्या चवींचे चोचले पुरवितांना...इतकेंहि करून त्यांचे मोकळेपणाचें वागणं तरी असतं ? परन्तु सबंध दिवसभर केलेल्या श्रमाचा परिहार व्हायचें राहिलें बाजूलाच, अगदीं माझ्या नसा नि नसा थकून गेल्यासारखें वाटतंय् मला...नुसत्या औषधांच्या बाटल्या रिकाम्या करून प्रकृत्या सुधारतात कां बायकांच्या ?

**आनंदरावः**—सातारला तुमच्या नवीन ओळखी झाल्या असतील ?

**सुशिलाबाईः**—आंबेगांवच्या अनुभवानें शहाणपण आलेंय् त्यांना. कोणालाहि भेटायला जाऊं देत नाहींत ते मला...

**आनंदरावः**—म्हणजे ?

**सुशिलाबाईः**—कशाला लाजूं मी...? आपल्या मैत्रीचा अर्थ त्यांनीं सरळ घेतला नाहीं.

**आशाः**—कमाल झाली म्हणायची भय्यासाहेबांची !

**आनंदरावः**—कांहीं विशेष तर बोलले नाहींत ?

**सुशिलाबाई**:—बोलले म्हणून मनाला लावून घेऊन करूं काय मी ? बायको आहे त्यांची मी .

**आशा**:—सारे स्त्री–पुरुष गुन्हे करण्यासाठींच जन्मतात कांहो ?

**सुशिलाबाई**:—असं कधीं झालंय् ?

**आनंदराव**:—भय्यासाहेबांपुढें नाना तऱ्हेचे गुन्हे न्यायासाठीं येतात. घडलेल्या गुन्ह्यांचे प्रकार वकील लोक शक्य तितक्या उघडपणें त्यांच्यापुढें मांडीत असतात. त्यामुळें त्यांच्या मनावर त्याचा विपरीत परिणाम होणें अशक्य नाहीं.

**सुशिलाबाई**:—न्यायासनासमोर आणलेले सर्वच गुन्हेगार नसतात.

**आनंदराव**:—एकदम कबूल आहे मला !

**सुशिलाबाई**:—नि सज्जन मानलेलीं माणसें गुन्हेगार नसतात असें नाहीं ! इथं आल्यावर मी चौकशी केली. काशीकरांची यमू याच गांवांत उतरली होती. नि—

**आशा**:—जाऊं द्याहो. तो अप्रिय विषय आतां नको !

**आनंदराव**:—तरीपण बायकांना आपल्या पतीशीं वागायलाच हवें.

**सुशिलाबाई**:—मी कधीं त्यांना विरोध दाखविला ? पण त्यांच्या संशयी स्वभावानें माझ्यावरचा त्यांचा विश्वास उडाला. कसें सहन करूं मी हें ? मेला नसता हा चेहरा चांगला तर किती छान झालें असतें ?

• आंबेगांवांत आनंदराव–आशेशीं त्यांचा परिचय होऊन सुभाताईच्या मैत्रीच्या सहवासांत सुशिलाबाईनीं नवा आनंद अनुभवला होता. त्यामुळें सध्यां असलेला त्यांचा कोंडमारा त्यांना असह्य वाटूं लागला तर नवल नव्हतें. त्यांना अनेक वेळां उदासवाणें वाटूं लागलें होतें. त्यामुळें त्यांच्या अगोदरच्या नाजुक प्रकृतीवर परिणाम होऊं लागला. ज्या घरांत आनंदी जीवनाचा उबारा नाहीं त्या घराच्या भयाण–भकास पोकळींत त्यांना अपुरेपणा वाटूं लागला...नि खरें म्हटलें म्हणजे हाच त्यांच्या मनाच्या असामाधानाचा मुख्य रोग होता...

**आनंदरावः**—क्षमा करा सुशिलाबाई! आमचा परिचय तुमच्या दुःखाला कारणी झाला!

**सुशिलाबाईः**—छट्–मुळीच नाहीं! पतीपत्नींमध्यें सुद्धां उत्पन्न होऊं न शकणारा असा स्त्रीपुरुष सहवासांतील विशुद्ध मोकळेपणा, लोभनीय आनंद नि जिव्हाळा असूं शकतो याची मला चांगली कल्पना आली! नाहीं तर मला वेडीला आमचे पतीपत्नींचे आडमोड जीवन म्हणजेच खरें जीवन असें वाटून मी जन्मभर खऱ्या आनंदाला मुकलें असतें ना! छट्...पशू म्हणून जगण्याची माझी मुळींच इच्छा नाही...

**आनंदरावः**—इतक्या योग्यतेचा मी नाहीं सुशिलाबाई!

**सुशिलाबाईः**—मी जाणतें तुमची योग्यता...नि ताई पण पुरेपूर जाणतात—तुम्हांला कळायचें नाहीं तें. मला मला माहित आहे तें. माझ्या भावनांकडे पहात आलां तुम्ही...हा मंगल योग संस्कारी माणसाशिवाय साध्य होतो कां कुणाला?

**आनंदरावः**—नि हीच तुमच्या पण संस्कारांची साक्ष नाहीं का?

**आशाः**—पुरे करा बाई हें स्तुतिपर्व! जा–सुंदरसा चहा करून आणा. त्यांना नि मला पण दीड दीड कप टाका. तुम्ही दोघंजणं चहा प्यायलां म्हणजे तुम्ही पहिल्याप्रमाणें हंसाल–खिदळाल–जा......

**सुशिलाबाईः**—मुख्य तें सांगायचें राहूनच गेलें कीं. आनंदराव, पत्र आलंय् कीं उद्यां सकाळीं ११ वाजतां ते येणार आहेत आम्हाला न्यायला. त्यांना उद्यांचा दिवस मी राहून घेणार आहे. त्यांना घेऊन मी तुमच्याकडे येईन–नि आपण चौघे जणं फिरायला जाऊं!

**आनंदरावः**—तुमचा कांहीं हेतु दिसतोय यांत मला!

**सुशिलाबाईः**—होय...खरें तें सांगतेय्–देखत देखत एकदां काय तो सोक्ष मोक्ष होऊन जाऊं द्या—म्हणजे एकदांचे त्यांचे मन साफ तरी होऊन जाईल...किती दिवस मेलें अशा कोंदटलेल्या वृत्तीनें जगायचें?

**आनंदरावः**—तुम्हालाच उलट त्रास होईल, विचार करा जरा!

**सुशिलाबाई**:—जाणतें मी! आईच्या तीर्थयात्रेचें निमित्त करून तुम्हाला मी बोलावलें असें त्यांच्या दुबळ्या मनांत येईल, पण खरा प्रकार तुम्ही जाणतांच...त्याला कोण काय करणार?

**आनंदराव**:—ठीक! तुमच्या विचाराबाहेर नाहीं मी.

त्यांना तें बोलणें वाढवावेंसें वाटलें नाहीं.

सुशिलाबाई चहा करण्यासाठीं आंत गेल्या.

**आशा**:—या भलत्याच हिरीरीनें संकटांत पडत आहेत....

आनंदराव विचारांत पडले होते...आशा शांतपणें बसून राहिली... सुशिलाबाई चहा घेऊन आल्या!

**सुशिलाबाई**:—इश्श! भांडणबिंडण झालें वाटतें इतक्यांत?

चहा झाल्यावर सुशिलाबाई तेथून जाण्यास निघाल्या. पण त्यांचा पायच तेथून हालेना...म्हणून त्यांनीं आणखी गप्पागोष्टी काढल्या...पण त्यांची आई घरीं एकटीच होती. धाकटी बेबी रडत असेल असें मनांत येऊन त्या अखेरीस उठल्याच!

**सुशिलाबाई**:—खरेंच! तुझ्यासारखी माझी धाकटी बहीण असती तर आलें असतें तुझ्याकडे राह्यला वर्षांतून एकदां तरी!

**आशा**:—नको ग बाई! अलिकडे बहिणी बहिणी सवती होतात म्हणे.

आशा मनापासून हंसली.

**सुशिलाबाई**:—वेडी ग वेडी! माझं लग्न झालंय् म्हटलें!!

**आनंदराव**:—तें कशाला? तुमच्यासारखी माझी बहीण असती तर हक्कानें आणली असती तिला माहेरीं!

**सुशिलाबाई**:—खरेंच? खरेंच? खरेंच कां हो?

**आशा**:—अशा काय करतां?

**सुशिलाबाई**:—माझ्या आईशिवाय कुणीच नाहीं मला माहेरचें! काय करूं? मी पुष्कळ म्हणेन! त्यांना आपलें हें नातें कसें पटवूं मी?

त्यांनी आपली खालीं घातलेली मान वर उचलली. तों आनंदरावांना त्यांच्या डोळ्यांत पाणी डंवरून आलेलें दिसलें!

**आनंदराव**:—हें काय असें ?

आनंदरावांचें हृदय भरून आलें, नि नकळतच ते सुशिलाबाईचे डोळे पुसण्यासाठीं पुढें झाले...पण...

**सुशिलाबाई**—कां ? भ्यायलां तुम्ही ?

**आनंदराव**:—नाहीं. पण मी तुमचा भाऊ आहें हें मला अनेक मार्गांनीं दाखवितां येईल.

**आशा**:—पण भावाबहिणींनीं इतक्या मर्यादा पाळायला कुठें आडवें आलें होतें इथें जग ?

**सुशिलाबाई**:—उदार हृदय आहे तुझें आशा...बरं तर मी जाते... उद्यांचें ठरलें ना ? मी येऊन जाईन एकदां सकाळची आईला बरोबर घेऊन–हं.

**आनंदराव**:—या ना.

**सुशिलाबाई**:—ठरलें ना ?

**आशा**:—ठरलें–ठरलें !

बरें झालें ! त्या दिवशीं सायंकाळींच सुशिलाबाई आपल्या मातोश्रींना घेऊन आल्या नाहींत तें.

नहरला जाऊन आनंदरावांनीं मोटार ठरवली नि त्याच रात्रीं त्यांनीं आपल्या सामानसुमानाची आंवरा आंवर केली.

प्रिय सुशिलाताई—

माझ्या बहिणीच्या सुखांत कुठलाहि व्यत्यय येऊं नये, म्हणून मला योग्य वाटलें तें आनंदानें करीत आहे. तिचें सुख तेंच माझें ! तिचें दुःख तेंच माझें ! नाहीं कां ? रागावणार नाहींस ना तूं....जरूर ती काळजी घ्यावी ! तशी काळजी आम्हीं घेतली म्हणून तुझ्या वृद्ध आईला आम्हीं न भेटतांच जात आहोंत.

तुझा भाऊ,

**"आनंद"**

दुसऱ्या दिवशीं ती चिठ्ठी सुशिलाबाईना पोंचेल अशी पक्की व्यवस्था करून आशा आनंदराव आंबेगांवला आले.

# १७

आंबेगावांत एके काळीं चालू असलेल्या " मराठा–मित्र " या मासिकाचे सर्व हक्क विकत घेऊन, दसऱ्याच्या सुमुहूर्तावर आनंदरावांनीं आपल्या साप्ताहिक " मित्रा " चा पहिला अंक आपल्या स्वतःच्या "मित्र मुद्रणालयांत" छापून प्रकाशित केला.

त्यांतील अग्रलेखाचा प्रथमचा भाग वाचला तर त्यावरून त्यांच्या धोरणाची कल्पना येईल.

## " उद्यांसाठीं "

" सागर फार अथांग असतो. त्याच्या तळाशीं मोतीं पोवळें, सोने चांदी वगैरे अनेक मूल्यवान् वस्तु पडून असतात तशीच खनीज पदार्थांची लयलूट असते. त्याच्या पोटांत विषारी वल्लरी आहेत, तशाच मानव जातीच्या सुखाला वृद्धींगत करणाऱ्या औषधी वल्ली पण अलोट आहेत. पाण्यांत छोटे मोठे जलचर आहेत; लहान माशांपासून देव माशांपर्यंत त्यांचे अनेकविध प्रकार आहेत. जगण्यासाठीं त्यांच्यातहि लढाई चाललेली असते. मोठा मासा लहानाला गट्ट करतो. वरील हवेंत वादळें होऊन समुद्रावर पर्वतप्राय लाटा उसळतात असा हा अस्थिर सागर कधींच शांत नसतो—तो शांत राहणेंहि शक्य नाहीं. त्याच्या पृष्ठ भागावर लहान मोठ्या लाटा उफाळत असतात नि कांठावर येऊन सारख्या धडका देत असतात......

वाचक मित्र ! तीच कांहींशी परिस्थिति मानवतेच्या अथांग सागराला लागूं पडते. स्थूलमानानें जरी आपण विचार केला तरी त्यांत अनेकविध प्रवाह आपणांस दिसून येतील...शेती करणारा—शेतकरी वर्गाचा कायमचा कंगाल वर्ग–शहरांतील कारखान्यांत कामे करणारा असमंजस मजूर वर्ग कांहींसा अडाणी भोळसट नि आळशी असतो. एकदमच पांढरपेशा वर्गाकडे पाहिल्यास गरीब नि कमींत कमी मिळकतीवर सर्व वर्गाच्या मुलांना ज्ञान दानाचें काम करणारा असा सदा दारिद्र्याने कावलेला शिक्षकांचा वर्ग असतो. तो आपलें म्हणून

निराळेंच जग करून त्यांत वावरत असतो. त्यापुढें म्हणजे कांहीं निरुपयोगी, चवचाल, नसत्या उचापती करणाऱ्या कज्जेदलालांचा वर्ग असतो. त्यानंतर खाऊन पिऊन सुखी लोकांचा असा आत्मनिष्ठ नि दुसऱ्यांकडे उपेक्षेनें पाहून आपलाच आपण गौरव करून घेणारा मोठा गट दृष्टीस पडतो. नि याहि वर्गावर मगरूरीने अरेरावी गाजविणारा, पण आपल्या खालच्या वर्गाच्या श्रमावर जगणारा असा वकील डॉक्टरांचा अहंकारी गट असतो. त्या वर्गाला आपल्या बुद्धिमत्तेची, नि लोकांचे आपल्याशिवाय चालत नाहीं या जाणीवेची अकारण श्रेष्ठता वाटत असते...दुसऱ्या कोठल्याहि वर्गाच्या लोकांना जणूं दर्जा नाहीं अशा तुच्छतापूर्ण भावनेनें ते जगाशीं वागतांना दिसतात. दुनियेंतील मानपान व्हायचे ती यांचेच व्हावेत असा यांचा जन्मसिद्ध हक्क वाटत असतो यांना ! याहि लोकांना डावलून जरा पुढें पाहूं लागलों तर मारवाडी, शेठजी, अशा गर्भ श्रीमंतांचा संघटित पण दिसायला विस्कटलेला असा अढळ गट असलेला दिसून येईल...वेळ आली म्हणजे धार्मिक कडवेपणानें हा गट एकजुटीनें दुर्बळाना पिळून काढण्यास सज्ज असतो. नि आणखी एक वर्ग राहिला. जगापासून अगदीं अलग पण आपल्या अस्तित्वानें सर्वांना खटकणारा असा अधिकारी–सत्ताधारी लोकांचा 'क्लब' जीवी वर्ग असतो. त्याच्या दृष्टीनें इतर जनता जगांत जगतच नसते. नडले म्हणजे त्यांच्यापुढें कारणाकारणांनीं उभे राहणाऱ्या लोकांना, ते आपल्या पायाजवळ घोटाळणाऱ्या कुत्र्याला जसे लाथाळतात तशाच कांहींशा प्रकारानें वागवित असतात. अशा अनेक गटांच्या, वर्गांच्या–सामाजिक थरांच्या संघर्षांत अनेक कलह उत्पन्न होतात. त्यामुळें कोणी कुणाकडे जरूर त्या निस्वार्थी नि स्वच्छ नजरेनें पाहणें शक्य होत नाहीं.

त्यांतूनहि स्त्रीपुरुष हा चिरंतनचा झगडा चालूंच असतो. धर्मभिन्नत्वामुळें मानवतेंत अगोदरच प्रचंड खिंडारे पडलेलीं असतात. तीं जोडलीं जाणें म्हणजे महा कठीण काम आहे. परधर्मीयाला समजून घेऊन सहिष्णुतेनें वागणें हें बहुतेकांना साधत नाहीं. हिंदुधर्मात सुद्धां चातुर्वण्य पद्धतीमुळें अनेक–हजारों जाती निर्माण झाल्या आहेत. त्यांतहि ब्राह्मण, ब्राह्मणेत्तर शाकाहारी–मांसाहारी असे नाना प्रकारचे पंथ नि सांप्रदाय निर्माण झाले आहेत. अशा जातीजातींतील वैमनस्या-

मुळें, परस्परांनीं आपापल्या भोंवतीं जाती निष्ठतेचें कडेकोट किल्ले बांधून घेतलेले आहेत. त्यांत परजातीयाला प्रवेश सुद्धां मिळणें शक्य नसतें मुख्य मुख्य जातींत सुद्धां सूक्ष्म भेद आहेतच. त्यामुळें कोणालाहि कुणाशीं संशय निरपेक्ष वागतां येणें जमत नाहीं. हा गुजराथी, हा कन्नड, हा मारवाडी, हा मद्रासी म्हणून आम्ही महाराष्ट्रीय प्रांतभेदानें–नि भाषा भेदानें त्यांना तुच्छ लेखतों. त्यांत भर म्हणून देशांत निरनिराळे पक्षोपपक्ष असतात, त्या त्या पक्षांचे अनुयायी आपापला कडवा, अभेद्य सांप्रदाय बनवून दुसऱ्यांकडे आपलीं नखें काढून बघत असतात. शिवाय दरिद्री, मजूर विरुद्ध भांडवलवाले–गिरणीवाले हा शहरांशहरांतील हिमालयाएवढा विरोध परस्परांत प्रचंड लढे उत्पन्न करीत असतोच नि या यच्चावत् सर्व लोकांपैकीं कुणाशींहि कुणाचें सूत जमत नाहीं. त्यांच्यातील विरोध, भांडणे, हेवेदावे, कायदेबाजी, वगैरे गोष्टी त्यांच्या पांचविला पूजलेल्या असतात. या अंतर्भूत कलहभावनेनें आपल्या आड येणाऱ्या व्यक्तिला वा वर्गाला नेस्तनाबूत करण्यासाठीं विरोधी गट अगदीं टपून बसलेला असतो. परस्परांविषयीं मत्सर, द्वेष, सूडाची भावना, अगदीं उतूं चाललेली असते. कोणाचा कोणाला विश्वास नाहीं. प्रतिपक्षाला दडपून टाकण्यासाठीं त्याचे पाय ओढण्याचें प्रयत्न मोठ्या प्रमाणावर राजरोसपणें चालूं असतात.

अशा अनेक मानवी वैगुण्यामुळें कोणालाहि सहाजिकपणें वाटेल कीं जग म्हणजे अंधार आहे—गोंधळ आहे—अनागोंदी कारभार आहे सारा ! अशा सहस्रविध भिन्न भिन्न वर्गीय लोकांना एकाद्या गोष्टीवर एकत्र आणणें म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखा विश्वव्यापी प्रश्न होय असा विचार येणें सहाजिक आहे. पण तसें मुळींच नाहीं. मित्रहो! सागराच्या पोटांत कितीहि चलबिचल होत राहो, त्याला म्हणून एक पातळी असतेच ! तशीच जनता सागराला पण आहे ! त्या दृष्टीनें पाहतां जनतेच्या आकांक्षा, ध्येयें नि तत्सिद्धीचे मार्ग एकच नसतात कां ? सर्वांना जगांत सुखानें—आनंदानें जगायची इच्छा असते, आपल्यापाशीं जरूर तेवढा द्रव्यसंचय असावा असें सर्वांनाच वाटत असतें; समाजांत राहून इतरांनीं आपणाला भलें म्हणावें, समाजांतील मानसन्मान आपणांस मिळावे, साधल्यास कीर्तीहि मिळावी असें सर्वांनाच वाटतें ना ?

नि समाजांतील प्रत्येक व्यक्तिला पाहिजे असलेल्या या समान गोष्टींच्या प्राप्तीसाठीं प्रथम–प्रथम आपणाला राष्ट्र म्हणून जगलें पाहिजे ! परकीय सत्तेच्या टांचे खालून आपला देश मुक्त करण्यासाठीं प्रत्येकाला जें कांहीं भरसक करतां येईल तें त्यानें केलें पाहिजे ! त्यासाठीं सर्व वर्गांनीं, गटांनीं, भिन्न धर्मीयांनीं, जातीय बांधवांनीं आपापले क्षुल्लक मतभेद विसरून प्रचंड अशी एकजूट तयार करायला नको काय ? स्वातंत्र्य संपादनाचें महत्कार्य एकट्या दुकट्यानें किंवा एकाच जातीनें किंवा धर्मानें संपादण्या इतकें साधें आहे काय ? देशांतील यच्चावत् लोकांनीं आपापलीं भांडणें कलह, भेद, विरोध पार झुगारून देऊन, क्षुद्र अशा स्वार्थी आकांक्षाला बाजूला सारून एका महत्प्रयत्नासाठीं एकच एक अभंग फळी तयार करायला हवी—केल्याशिवाय राष्ट्राचें—त्यांतील समाजाचे—समाजांतील व्यक्तींचे लवमात्र हित साधणार हें ओळखून......"

आनंदरावांनीं आपल्या अग्रलेखांत यापुढें, स्वातंत्र्य मिळविणें ही अपरिहार्य गोष्ट आहे असे मानल्यानंतर तिच्या प्राप्तीसाठीं जनतेंत एक राष्ट्रीयत्वाची प्रवृत्ति फोंफावण्यास मुख्यत: कोणत्या गोष्टीकडे लक्ष दिले पाहिजे, समाजांतील विषमता नाहींशी व्हावी म्हणून आर्थिक वाटणीचा पाया कसा भक्कम करायला हवाय् नि त्यासाठीं कोणतीं साधनें कशीं वापरलीं पाहिजेत याचें निदर्शन करून, तीं साधनसामुग्री आम जनतेच्या हातीं देणें, गरिबांची अखंड पिळवणूक करणाऱ्या बुद्धिजीवी पांढरपेशांपासून त्यांचे संरक्षण करणें, जनतेवर होणाऱ्या अन्यायाची निर्भीडपणें दाद लावणें, नि अशा रीतीनें तिला आत्मविश्वासाची जाणीव देत तिची जागृति करणें, वगैरे विवेचन करून, आनंदरावांनीं उद्यांसाठीं जनतेनें करावयाच्या क्रांतीचें स्वरूप नि मार्ग दाखविण्यासाठीं त्याच्या ' मित्रा ' चा जन्म होत आहे हे अगदीं स्पष्ट केलें.

त्याच अंकांत कांहीं उद्बोधक स्फुटें पण आलीं होतीं...त्यांतील एकात आवेगांवांतील वनिता मंडळाचें कार्य पुन्हा चालू करणें हें महिलांच्या हिताचें आहे असें बजावून पुढें लिहिलें होतें कीं श्री. भय्यासाहेबासारख्या अधिकाराधिष्ठित सद्गृहस्थांच्या पत्नी सौ. सुशिलाबाई यांच्यासारख्याच स्त्रियांनीं पुढाकार घेतला तरच मंडळाचें काम होईल अशी कल्पना करून घेण्यांत शहरांतील स्त्रियांची

दुर्बलता दिसून येत आहे. कोणाहि एकाद्या समजूतदार महिलेनें चिकाटीनें, निष्ठेनें पुढें येऊन त्या कार्याची धुरा हातांत घेतली तर मंडळाचें कार्य यशस्वी झाल्याविना राहणार नाहीं.

दुसरें स्फुट कांहींसे मजेदार होते.

" आम्हाला कळतें कीं येथील एका कायस्थ सद्‌गृहस्थांकडे त्यांच्या नेहमीच्या रिवाजाप्रमाणें रविवारचा 'बाजारच्या' भोजनाचा कार्यक्रम होता. मांसाशनाच्या वेळीं त्यांच्या एका चारपांच वर्षांच्या मुलाच्या घशांत त्यांतील एक हाडासा कपला अडकून तो घाबरून गेला. त्याच वेळीं समोरीच्या एका ब्राह्मणाच्या घरीं कसलीशी मेजवानी चालू होती. त्यांत हजर असलेल्या एका डॉक्टरांना त्या मुलाची झालेली ती प्राणांतिक हकीकत समजतांच त्याच्यावर उपचार करण्यासाठीं ते गेले. पण त्यांच्यापाशीं जरूर तीं साधनें नव्हतीं— इतक्यांत दुसरे एक डॉक्टर आले, त्यांनीं त्या डोळे पांढरे केलेल्या बालकाच्या घशांतील ते हाडूक मोठ्या कौशल्यानें बाहेर काढलें. येथवर झाले त्याविषयीं आम्हाला कांहीं बोलायचें नाहीं. पण नंतर त्या ब्राह्मणजातीयांचें भोजन चालू असतांना त्या पंक्तीमध्यें, कायस्थांच्या नि मांसाहारी लोकांच्या दैनंदिन जीवनावर विनोदाचे अनुचित फवारे सुटत होते. " हाडें घशांत अडकतात तर खातात कशाला हे मांस ? मरा म्हणावें ! " अशा तऱ्हेचें तिरस्काराचे उद्‌गार तेथें निघाल्याचे त्या कायस्थांच्या कानांपर्यंत गेल्यांचे समजतें. आम्हाला एवढेंच स्पष्टपणें उच्चवर्णीयांना वजवायचेंय् कीं अशा क्षुल्लक प्रसंगानें आपली जातीय श्रेष्ठता प्रस्थापित करतांना तुम्ही आपलेंच हंसें करून घेत आहां ! यांत तुमच्या मनाच्या दुर्बलतेची प्रतिक्रिया उमटून क्षुद्रत्व व्यक्त होतें. केवळ शाकाहारी राहिल्यानें देवपण प्राप्त होतें असें मानणें हा शुद्ध भोळेपणा होय ! दुसऱ्या जातीची अवहेलना करून आपली श्रेष्ठता सिद्ध होते ? नि अशानें जातीय प्रश्न सुटत जाण्याऐवजीं जास्त बिकट होत जातात याची कोणाला कल्पना तरी आहे काय ? जनतेला एक राष्ट्रीयत्वाची कल्पना पटवितांना अशा क्षुल्लक गोष्टींचा केवढा अडथळा होतो हें आम्हा उच्च वर्णीयांना कळेल तो सुदिन ' !

' मित्रा ' मध्यें आणखी चार स्फुटें होतीं...एकांत त्यांनीं जातीय वृत्तीवर हल्ला करून ब्राह्मणेतर वादाचें भूत गाढण्याची हीच संधि होय असें बजाविलें होतें.

त्यानंतर काँग्रेसची युद्धविषयक भूमिका विषद करणारे व आगामी प्रातिनिधिक सत्याग्रहाचें वैशिष्ट्य प्रतिपादणारे असे एक जोरदार स्फुट पण लिहिलें होतें. शिवाय—

शिवाय त्यांत एक लघुकथा होती, चटकदार बातम्या होत्या नि दोन रंजक असे विषयहि त्यांत आले होते.

सध्याच्या चालू युद्धासंबंधी मात्र आनंदरावांनीं पहिल्याच अंकांत कांहीं न लिहिण्याची दक्षता घेतली होती. कारण सांप्रतचें चालू युद्ध जनतेचें नाही याची त्यांना स्पष्ट जाणीव होती.

---

# १८

आनंदरावांनीं 'मित्रा' चा नमुना अंक आपल्या सर्व मित्र परिचितांकडे अवलोकनार्थ पाठविला होता.

श्री. भय्यासाहेबांनीं अंक पोंचल्याचें कार्ड पाठवून, वाचून पहातां आपले विचार एकांगी वाटतात, असें लिहिण्यांत आपण आपला वेळ व द्रव्यखर्च करीत आहां याचें आश्चर्य वाटतें असें लिहून त्यांना कळविलें होतें.

विनायकरावांकडून एका 'मित्रा' ला मदत म्हणून शंभर रुपयांचा चेक आला होता. बरोबर त्यांनीं आनंदरावांचें सहृदयतेनें अभिनंदन केलें.

मात्र सुभाताईनीं एक चिठी लिहिली होती. ती त्यांच्या वृत्तीला साजेशी होती.

"नाहीं नाहीं म्हणतांना तुम्हां उभयतांना हें बाळ झालेलें पाहून मला आनंद वाटतोय्. त्याला बाळलेणें आज सोबत आम्ही पाठविलें आहेच! सौ. आशा आनंद वैद्य या 'प्रिंटर' म्हणून जाहीर झाल्या आहेत. छान— सुरेख...स्त्रिया प्रिंटर असतात—पण त्या आपल्या पती राजाच्या छापखान्याच्या नव्हे...बाई...हें तरी सांभाळ आपलें अपत्य अगदीं जिवाभावानें, प्रेमानें!! नि तें वाढावें—पराक्रमी व्हावें—त्यानें आपल्या मातापित्याला यश किर्ती— धन्यता मिळवून द्यावी असें मी मनापासून इच्छितें......"

विशेष म्हणजे आंबेगांवच्या आमजनतेनें त्यांच्या ह्या अंकाची एकहि प्रत त्यांच्या छापखान्यांत राहूं दिली नाहीं. त्यांचें तें स्वागत अपूर्व होतें.

